वही क्र ० २ -

# कां ना आला बाल राजा ?   आणि अन्य कविता

**काव्य संग्रह कृति : श्रीयुत रामचंद्र वामन पंतोजी  एम ए (संस्कृत , AMU 1927)**



email:atul.pantojee@gmail.com

प्रथमावृत्ती:२०२५ ( ज्येष्ठ शुक्ल नवमी १९४७ शके, ०४.०६.२०२५ )

## प्रस्तावना

सदर कृति श्रीयुत रामचंद्र वामन पंतोजी ( जन्म: 1892, देवलोकगमन: 29 डिसेंबर 1974) , एम ए (संस्कृत , AMU 1927) ह्यांचे उपलब्ध असलेल्या तीन हस्तलिखित वह्यांचे तंतोतंत पुस्तकीकरणाचे प्रयत्न आहे. यांत संस्कृत आणि मराठी काव्य आहेत.
रचनाकाराचे अल्प परिचय खालील प्रमाणे आहे.
ग्वाल्हेर राज्यात वास्तव्यास असलेल्या श्रीयुत वामनराव पंतोजी कुटुंबातील ते मधले अपत्य होते. पिढीजात शिक्षकी वृत्ति मध्ये स्वतःला गुंतवून , 30 वर्षे तत्कालीन ग्वाल्हेर राज्यातील ग्वाल्हेर, उज्जैन , मंदसौर व गुणा ह्या ठिकाणी ते शिक्षक आणि नंतर हेडमास्टर राहिले. वयाच्या पस्तीसाव्या वर्षी अलीगढ मुस्लिम यूनिवर्सिटी येथून प्रायवेट एम ए सुद्धा केले.
1942 पश्चात सेवानिवृत्ती नंतर शुजालपुर च्या मंडी समिति हाई स्कूल मध्ये मुख्याध्यापक राहिले. त्यानंतर उज्जैन येथील उद्योजक श्रीमान लालचंद सेठी यांच्या आग्रहास्तव 1947 ते 1974 पर्यन्त इंदूर येथे त्यांचे नगरश्रेष्ठी बंधु श्री भंवरलाल सेठी (मेसर्स बिनोदी राम बालचंद, बँकर्स अँड ट्रेजरार बॉम्बे बरोडा अँड सेंट्रल इंडिया रेल्वे) यांच्या कुटुंबास शिकवण्यासाठी ट्यूटर-गार्डीयन होते.
सदर कृति साधारणपणे १९२८-१९३५ च्या काळात लिहिली गेली आहे.

पृष्ठ क्रमांक १

थर्मामीटर में ना लगतो बुखार दाक्तर शाब
हड्डी पसली दूख रही तोऊ दाक्तर शाब
खाँसी आवे , नींद न आवे , बैठे कटि है रात

Blank

## प्राक्- कथन

वही क्रमांक दोन मध्ये एकूण ६९ कवितांचे संग्रह आहे. ३१ कविता पूर्ण आहेत , २६ कविता अपूर्ण राहिल्या आहेत आणि १३ मंगळाष्टक आहेत . बहुतांश कविता शीर्षक नसलेल्या आहेत. घरगुती प्रसंगावर बरेचसे काव्य आहेत. राजाश्रयी असल्यामुळे प्रासंगिक काव्य सुद्धा ह्यात आहेत. अनुक्रमणिका चे पानं नाहीत, त्यामुळे आहे तसेच कंटिन्यू केले आहे. बरीचशी पाने ब्लॅंक आहेत त्यांचा वापर कोमेंट्स आणि इंडेक्स साठी करून घेतला आहे.

- वही क्रमांक दोन जी मागील वर्षी उपलब्ध नव्हती ती हीच आहे .
- अनेक अपूर्ण आणि शीर्षके नसलेल्या कविता असल्यास अनुक्रमणिका करता आलेली नाहीत तरी मूल हस्तलिखित प्रमाणे संपूर्ण क्रम जमावेलेले आहे. शेवटची पाने reverse ऑर्डर मध्ये आहे ति तशीच दिली आहे. एकंदरीत ही वहीचे वाचन केल्याचा भास देईल . ह्यातले काही लेखन हिन्दी आणि , फारसीयुक्त उर्दू मधील आहे.
- कोष्टकांत खाडाखोड किंवा अस्पष्ट असलेल्या नोंदी आहेत. काही चुका असणे शक्य आहे, त्या अवश्य सूचित करा . त्यावर योग्य ते सोपस्कार करता येतील.

हुबेहूब वही मध्ये असल्या प्रमाणे पुस्तक केले आहे.

- संपादक

## भास्कर[१] विनंती

ज्याचा स्वभाव अतिगोड असे विनोदी
जो घालितो भर सदा जनता - प्रमोदी
जो अंतरीं उमलवून कळी कळीला
उद्यानिं जो प्रगटवी नव भाव लीला ॥ १ ॥

तेजोनिधी ( जो ) 'रचितसे कृति जो कलांच्या
(ज्याच्या कला ) कृति ( मनोहर कल्पना ) नव्या मनोहर कल्पनांच्या प्रतिभा कलांच्या
( शालीन प्रेमळता सत्वनिधि जो निधि भावनांचा , भारून टाकिति जना मृदुभावनांच्या )
अत्यंत सात्विक रची ( अशा कृति कल्पनांच्या ) मनोहर भावनांच्या
नुस्तें न जो कधिं करी जन रंजनाला
घाली सवें झणक्षणीत नवांजनाला ॥ २ ॥

जो ने विदाउट तिकीट दिगंतरांत ( दिगंतरांत जना फिराया )
(ज्याच्या बरोबर प्रवास सुखांत होई)
रामा समान निज मानस पुष्पकांत
सांतांतुनी अति समुन्नत भागिं जाया।
याया , अनन्त नभ वैभव तें बघाया ॥ ३ ॥

(ज्याच्या बरोबर अनन्त(स्व)रूप याया)
जेथें न पार्थिव नियंत्रण अल्प बांधी
जेथें अहा सहज लागतसे समाधी
आनन्दनन्दनवनीं तसल्या रमाया।
घे तू बरोबर मला खग वृंद राया
मी येतसे उचलतूं कवि वृन्द राया ॥ ४ ॥
Continued on page 6
फुट नोट : १ :- भास्कर = श्री भा . रा . तांबे यांना उद्देशून

पृष्ठ क्रमांक ४

Blank

वही क्रमांक 2

annexed at end : Loose मंगळाष्टका

- 1. 31 03. 2010 व्रत्तबंधन चिरंजीव धवल पंतोजी
- 2. 22 .05.1972 चिरंजीव सौ कां माणिक ज वैद्य शुभविवाह
- 3. 27.06.1965 चिरंजीव श्री अनंत दिनकर माणके शुभविवाह
- 4. 24 .11.1969 चिरंजीव सौ कां मंगला ज वैद्य
- 5. 28.01. 19?70 चिरंजीव सौ कां सुशीला भास्कर पंतोजी
- 6. 15 .05.1958 श्री यशवंत रामचंद्र पंतोजी
- 7. 20.02. 1958 श्री नलिनचंद्र सेठी
- 8. 16 .02. 1957 चिरंजीव सौ कां गिरिबाला सेठी
- 9. 15.06.1963 चिरंजीव विजय विठ्ठल खोले
- 10. 12 .07.1959 चिरंजीव सौ कां मंदाकिनी पंतोजी

- नोटबुक मध्ये मंगलाष्टकें
- पेज 72 73 जेनेरिक मंगल चिंतन 20 .11 .1936
- पेज १०३ वत्सला दामोदर दीक्षित 25 .05. 1946

++++

- हे आयोजन 05.06 1946 साठी होता वासुदेव दत्तात्रय दीक्षित यांचा उपनयन 2 .06. 1946
- पेज १०४ लीला गजानन माणके आणि दत्तात्रय गणेश उमडेकर 12 .06. 1946
- पेज 106 चिरंजीव सौ कां मालती शंकरराव जळगांवकर रिटायर्ड डीएसपी काला पीपल 07.06. 1946 यांचे लग्न वसंत श्रीनाथ पाठक यांच्याशी
- पेज १०९ चिरंजीव सौ कां गिरिबाला राजेंद्रकुमार सेठी 16 .02. 1957
- पेज 112 चिरंजीव श्री नलिनचंद्र सेठी 20.02.1958
- पेज 115 चिरंजीव यशवंत रामचंद्र पंतोजी 15.05. 1958
- पेज 117 चिरंजीव रामभाऊ कृष्णराव माणके आणि विजया मजलीकर 3 .06.1958
- पेज 118 चिरंजीव सुलभा 15 जून 1958 विवाहोत्तर प्रसंग
- पेज 119 चिरंजीव सौ कां मंदाकिनी 12.07. 1959
- पेज १२० चिरंजीव विजय विठ्ठल खोल 15.06. 1963
- पेज 122 चिरंजीव प्रभाकर जयवंत वैद्य व्रतबंध 28 .04.1963

माझी कळे मज असे किति शक्ति थोडी
माझें कवित्त्व कळते मज , नाहिं गोडी
ने रे मला तुज बरोबर उंच पक्ष्या
सामर्थ्यहीन मम पक्ष अलक्ष्य लक्ष्या ॥ ५ ॥
संपातिच्या परि अतां पसरून पंखां
ओला तुझा कर घनांबुंत पंख पंखा
होता सुरू मग सुशीतल गोड वायु
तुझ्या बरोबर उडेल तुझा जटायू ॥ ६ ॥
तूं आपला तळप भास्कर तेजमूर्ती
थोडा प्रकाश मज दे तळपेन रात्रीं
येवो रसांतलिं अपूर्व गोडी
देवो तुम्हांस सुख भास्कर चंद्र जोडी
देवो धरेस सुख भास्कर चंद्र जोडी ॥ ७ ॥

(विडंबन सुधारून २२.०४.१९३६)

# क्षिप्रे वरला धोबी आला । कपडे घेउनि सवें निघाला

गिऱ्हाईकांचे कपडे घाली
नटुनी सजुनी फेऱ्या घाली
प्रतिभेच्या घरिं स्वारी आली
भवति प्रतिभे कपडे घाला

ऐकुनि कानीं त्याची वाणी
प्रतिभा स्फुरली मंचकि बसुनी
वदली स्वर्गीय गुंजन करूनी
अमुचा धोबी खालीं उभंला

करूनी मधुपद पदविन्यासा
निसर्ग रुचिरा मधुमद हास्य ( हासा)
प्रगटुनी मधुभाव विलासा
अर्पिति साडी चोळी त्याला

त्या वसनानीं भरली झोळी
फिरूनी फिरूनी गोळा केली
क्षिप्रे वरती मग त्या नेली
धुवुनी निर्मल करण्याला

गोरा भुरका मुलगा आहे,  यावर तूं भुलूं नये मुली
त्याच्या डोळया मधली चंचल , चमक न दिसली तुला मुळीं

त्याची जहरी नजर वाटते , भाळुं नको तूं गऽ बाळे
भुरळ घालुनी युवति जनांना , पाजिल जहराचे प्याले

अंधळे असतें प्रेम म्हणुनि हें पसरे तव नयनांत धुकें
उसळन असलेल्या लहरीवर तव मन वाटे मज बहके

आवर आवर क्षणिक आमिषा गोडिं गुलाबी ची भाषा
मासोळी परि पाशा मध्ये फसवोन तुला अभिलाषा

गुलाब फुललावर हा परिमल वाटे तुज कीं  दरवळला
आंतिल कांटे तुज ना दिसले भुजंग अथवा लपलेला

डोळयांतील ती एकच ठिणगी वारा मिळतां ( अनुकूल ) जसा हवा
(एकच त्याच्या वणवा पेटवुनी संसार)
करील संसाराची होळी , उपवनिं पेटवुनी वणवा

तव नयनाला दिपवुनी टाकी , कीं त्याच्या नयनांतिल
धूमकेतुची चमक मानती बिजली
 कडकडुनी वर सुंदर मंदिर ढांसवेल हा कधिं खालीं

तुला वाटते पडते कंठीं परिमल पूरित स्मितमाला
वाळुनि ना पण लवकर जावो , भीती वाटे हृदयाला

हंसणे बघणें याचे वाटे फार भयंकर चंचल ते
विविध रीतिनें मधु रसपानाची इच्छा तेथें मज दिसते

स्थिरवृत्तीची नजर निराळी भोळी भाळी सरळपणाची गऽ असते
तूं तर भोळी भाळी बाले , तुज ना बघतां हें येतें

वाटे झाले तुज मी मोठी समजुं लागले किति मजला
वाटे माझे मज हित कळतें , वाटें खरं ना हें तुज ला

परन्तु म्हातारी मी रस्ता, चालुन आले संसारीं
दिसते म्हणुनी तनये मजला, जीवन यात्रा तव सारी

समजु नको गऽ कीं मी येते तुझ्या सुख्याच्या अशि आड
तुझ्या जीवनीं विहिर इकडे , तिकडे दिसतें मज आड

तुला शिकविलें , मोठे केलें , करावयाचे तें केले
वेळिंच सावध हि तुज केले , आतां कर तुज दिसे भले

बजावुनि मी पुन्हां सांगते , माझे उरले किति दिवस
तुज कळकळीच्या कठोर वाणी , विषयां येवो न च किळस

दुराग्रहानें विवश होउनी , करशिल तूं जरि कांहि तरी
पोळुनि पश्चातापें मागुनि आठव जननी ही म्हातारी

अभंग

निर्मळ झोळी हातीं घेउनीया । फेऱ्या देउनियां घरो घरीं

क्षिप्रेच्या वरला जोगीराज आला । झोपी गेलेल्यांना जागवाया

१६ . ०६. १९३६
नको कळवुं जे तुज न कळले । म्हणशि हृदय तव किति हळहळले
थोरपणाची तूझी ऐट (/मोडकि माझीअसूं दे खाट )
ज्याची पुरता मजला वीट (/फुटलेले हे माझे ताट )
भिकार माझा सारा थाट
त्याची महिमा तुज पण न कळे

दारीं तुझ्या हत्ती घोडे
पहारेवाले नाहीं थोडे
तेथे याया माझें घोडे ?
नाहीं काहीं अगदीं अडलें

ढुंकुनि तिकडे न कधीं पाहिन
असाचं अपला जगतीं राहिन
प्रेमाची मी गाणीं गाइन
जपेन आहे जें उरलेलें

कुठल्याशा मंदिरिं राही
सगुण मूर्ति जी विलया जाई(/नेई)
निर्गुण गाणीं मी तरि गाई
निर्गुण रूपीं मम मन भुरलें

केला प्रेमाचा उपहास ।
आज पासुनी नवविलास ।
निर्गुण प्रेमीं लागे ध्यास ।
न कळे तुजला पण मला उमजले

# आशावाद

१२.०६ . १९३६

देतां , द्या, म्हटले कधीं- मज नको,  द्यायास दानी अहा
जें मी मागितले नसे तरि दिले , मागे असे ऐकले
देतां द्या , तुम्हि दानशूर
आतां ऐकतसे पुन्हां परतुनी ( वळुनिकीं ) तें मागतां जें दिलें

दानी तेच स्वनाम-धन्य जगतीं ख्याती अहा पावती
दाना देउनि एकदा परत जे केव्हांहि ना मागती

लोभी  लोंचट हे असे मन खरे ,  आशा तशी बावळी
धांवे आकृति पाहुनी, जवळ ती , जातां दिसे सावली

भेटाया ती लव ली भ्रमांत भुलली लोळे धुळीच्या मधें
छाया जाय मिळून आकृति मधे , आशा निराशे मधे

आशेची किरणें नवी मिसळुनी रात्रींत जातीं अशीं
कंठावी रजनीं निराश्रित जनें सांगो कुणीती कशी

कोठे ही खिडकी मधून वीज न दिसे किंवा दिवा तेवता
हा काळोख हि फार दाट पसरे ये वाट न पाहतां

तों कोणी हळु बोलला स्वकरही ठेवुन पाठी वरी
येऊंदे रवि विश्वनाथ क्षितिजीं ( भगवान् दिनेश वरतीं ) वर तो धीरा धरी तोंवरी

पृष्ठ क्रमांक १८
ता ३. ८. १९३६
होतें मन्मन शून्य पूर्विं स्फुरल्या केव्हांहि ना भावना
होती हृन्मरुभूमि पूर्वि दिसलें कांहीं न वाळू विना

शून्यांतून अतां परी प्रगटली  सृष्टी नवी वाटलेली
वाळूतून हि वाट नन्दनवना जाया दिसूं लागलेली

कोणी जादुगिरीण भेटलि मला स्वर्गीय ती चंद्रिका
टाकूनी रजतांचला मजवरी  लावा नवी तंद्रिका

जेथें कांहि नसे तिथे प्रगटवी ती रम्य जादूगिरी
स्पर्शानें परिसा परी मम तनू स्वर्णापरी ती करी

राहो दूर किती तरी पण मला पत्राश्रयें तारि ते
पत्रीं मौक्तिक पंक्ति पाठवुनिती हंसा जणूं चारिते

किंवा गुंफुनि पुष्पगुच्छ मजला पत्रान्तरीं धाडते
पत्रीं मंत्र जपावयास अथवा धाडून ती भारते

x x x

ही भावोत्कटता अशीच टिकत माझ्या तुझ्या अंतरीं
सौन्दर्य नटणार सृष्टि सगळी निःशंक गे सुन्दरी

पृष्ठ क्रमांक १९
१.०९. १९३६

( दिंडी )

चिमुकला हा बहिणींत बाळ भाऊ
बसत फोटोला वडिल सकल म्हणत पाहूं

बाप आई ही म्हणति वाहवा ! रे!
बघति कौतुक तें , सकल इतर पाहणारे ॥ १ ॥

प्रभटली ती राहिली उभी नीट
तिची केवळ हो आपली च ऐट

दुसरी कृष्णा ही थोर ली बहीण
बसत खुर्ची वर वाटते लहान ॥ २ ॥

सहज तिरकस ती वळवि लोचनांला
छबुकल्या च्या कौतुका पहाण्याला

झळकतें स्मित गोडसें तिच्या गाली
प्रेममूर्ती ती खुलुन दिसे बाळी ॥ ३ ॥

तिघां वर तरू मागून दोन छाया
आइ बापा परि करिति वरूनि माया

कळया दोन्ही बाजूस शोभिवंत
मधें फुललें हें फूल एक शांत ॥ ४ ॥

अंतर्दृष्टि करून मी जगतिं जो न्याहाळुनी पाहतो
तों तों तामस भाव स्पष्ट दिसतो , अन्योन्य संबंधितो

संसारी उसळून उंच वरतो , उत्तुंग त्या नेहमी स्वार्थीतरङ्गावली
देता सात्विक भावना बुडवुनी ,     अन्योन्य राष्ट्रांतली

आहे हे सगळेच साधु बगळे , चित्तामधें कावळे
यांचे गोडगळे , गळे मधुरता , कावा न कोणा कळे

काळिजे दुबळे गरीब फंसती जाळयामधें बावळे
त्यांचा भोवति पाश आवळ पडे मुक्ती कधीना मिळे

## प्रेमाची भूक

काहीही मजला नको न करितो  कोणास मी याचना
आहे मी अगदी निरिच्छ कधि ही मागें न कांही कुणा

झोळी ही धरिली करांत फिरतो हा वेष मी घेउनी
प्रेमाची मज भूक केवळ असे भिका मला द्या कुणी

आईबाप मला लहान असतां प्रेमांत जोपासती
काका भाऊ बहीण मित्रजनही प्रेमामृता वर्षती

मोठा होत असे जगीं जसजसा प्रेमाचिया मण्डपीं
प्रेमाचा  मधु मी पिऊन फिरतो उन्मत्त सा मद्यपी

प्रेमाचा महिमा परन्तु नव्हतां ठाऊक जेव्हां मला
तेव्हां त्या मम मानसा सुरुविती संपूर्ण त्याच्या कला

आतां मात्र कुणी हि ना मज पुसे जेव्हां असे भूक ही
प्रेमावीण जगांत काय जगणें (जसा )शून्या दिसे हीन ही

मध्यान्हींत लखीं किती  श्रमित ( तृषित ) या संतापलेल्या जिवा
(थकवा माझा कुणी घालव )

अज्ञानांतच वाटली सुखमयी झोंपेतली शांतता
होतां जाणिव जागृती प्रगटली दुःखात्मसंमिश्रता

धन्य होति आज नयन । जय जय जय नृपति बघुन
पश्चिम दिङ्मार्गक्रमुन
पूर्वे ला हळु हंसवुन
उजळविति नव रवि किरण

हृत्कलिका हंसित वदन
उदयाचल सिंहासन
गुंजन करि मंद पवन ।
दे भारत हृदय (भवन ) भरून ।
स्फुरते म्हणून नविन कवन
सर्वाशा दिसति ( /उठति ) खुलुन ।
करूनि गगन सुमन चयन ।
उधळीता दिग्देविवसन ।
उगवत वांछीत शुभदिन नृप पूर्वज बघति वरून

## दीर्घ काव्य

टांग्यामधे बसुनि चालली एक बाला
मांडी वरी बसवुनी अपल्या मुलाला
प्रेमे तिनें सजविली तनु बालकाची
होती अपूर्व तिज हौस हि दागिन्यांची ॥ १ ॥
माहेर गांविं कुठल्या तर जावयाला
ती सासराहुनि निघे अति धीट बाला
लागे तिचें मन उचंबळुं फार हर्षें
ती एकटी , शिशु तिचा वय चार वर्षें ॥ २ ॥
होती म्हणा परम धैर्यवती म्हणून
ती चालली न भय मानसिं बाळगून
टांगा तिचा भरमसाट हि धांवु लागे
माहेर ये जवळ हें तिज वाटुं लागे ॥ ३ ॥
माहेर च्या सरळ जाइन आज गांवीं
होणार जे मुळि तिच्या न च कांहि गांवीं
नेई तिला पळवुनी खळ आडवाटे
मार्गीं नशीबिं फुटतात नवीन फाटे ॥ ४ ॥

कांटें पथीं पसरले चहुं बाजु तीच्या
त्राता न संनिध कुणी अबला सती च्या
पाहुन वेळ स्थळ काळिज चर झाले
वाटे अवेळिं कशि मी इकडे निघाले ॥ ५ ॥
ना ऐकले वडिल जे घरचे म्हणाले
मी भूषणें शरीरिं घालु निकां निघाले ?
काळोखही हळु हळु दिन वैभवाला
आला गुहेंतून कुठून लुटावयाला ॥ ६ ॥
भानू दिगंतरिं  गुहेंत पळे दडाया
पृथ्वी मुखवर  पडे अति खिन्न छाया
किर् किर्र कर्ण कटु रातकिडे करीती
त्यांचे न कण्ठ दमती न च श्वास घेती॥ ७ ॥
ते गर्जति मिळुनि एक खड्यासुरांत
भेसूर नाद भरले सगळ्या वनांत

पंखांस ही पसरती घुबडें उडाया
घूत्कार कर्कश हि लागति ऐकुं याया ॥ ८ ॥
हाणी क्षणो क्षणिं हया वर चाबकला
बोले म्हणून दरडावुनि राक्षसाला
आकर्ण ताणुनि म्हणे नयनास ' मांगा!
ताणून खेंच हय थांबव शीघ्र टांगा ॥ ९ ॥
दुर्लक्ष्य तो करितसे न लगाम ओढी
तों ती करें चपल मागुन त्यास ओढी
क्रोधांत ती करकरा मग दांत खाई
मुठ्ठ वळून सरके हळु क्रुद्ध बाई ॥ १० ॥
बुक्के धमाधम नराधम पृष्ठभागी
मारीत ती वरिवरी अबला अभागी
होतां सुरू त्वरित त्यास असह्य मारा
मागें करास वळवी खळ पाठमोरा ॥ ११ ॥
आरक्त नेत्र वळवी वदनास मागे
विक्राळ तो पसरतो जबडा हि रागें

जाई गिळून जणुं वाक्शर त्या सतीचें
(पंजा) सारे करी सहज निष्फळ यत्न तीचे ॥ १२ ॥
एक्या करें धरि लगाम दुज्या करानें
वेणी धरी सहज राक्षस तो उभ्यानें
मैना करी धडपडीस सुटावयाला
तो आवळी स्वकर पंजर बंधनाला ॥ १३ ॥
चावे सती कडकडून करास घेई
सोडी न तो मणगटांतुन रक्त येई
घोड्यास आवळ धरून लगाम ताणी
क्रुद्धेस तो धरूनि ओढत घट्ट वेणी ॥ १४ ॥
दोघास तो करि नियंत्रित एक वेळ
चालू हिडीस असला क्षण कांहि खेळ
टांग्यातुनी उतरतीं मग खालिं दोघे
बाळा कडेवर हिच्या उचलून तीघे ॥ १५ ॥
काळे असे कुळकुळीत मन शरीरें
भ्यावें कुणीहि बघुनी ह्रदयांत धीरें
तो काळ सर्प तुकवी निजमस्तकाला
डोळेहि लाल शिर रूप जणूं फणाला ॥ १६ ॥

दोरीस लोंबकळती स्व करांत घेई
घेऊन पाश यमराज जणुं काय येई
आंगावरी करूनि चाल सवेग आला
अत्यंत क्रूर विकटानन गाडि वाला ॥ १७ ॥
झाली झटापट सुरू पण ती कुरंगी
अत्यंत गांगरूनि  जाय निजंतरंगीं
ती ओरडे बडबडून  रडे नितान्त
आकान्त ती करितसे ; पण तो कृतान्त ! ॥ १८ ॥
ती लावि घट्ट हृदया अपला जिव्हाळा
ती शोभली जननि कंठिं लहान माळा
ती बंधनांत कर पंजरिं पोपटाला
ठेवूनि ती जपतसे निज  हृन्मण्याला ॥ १९ ॥
आई जिवा पलिकडे जपते जयाला
त्या पांखरास हिसकावित गाडिवाला
व्याधा परी कर करू खळ खाइ दांता
वाटे करू चुरमुळ उपटून हाता  ॥ २० ॥
मुंडीस कीं  मुरगळून करास त्याच्या
पंखां जणूं उपटण्या खगशावकाच्या
हें हिंस्त्र कर्म करण्यास तयार झाला
तो सज्ज राक्षस किडा चिरडावायला ॥ २१ ॥

तें माउली बघुन हंबरड्यास फोडी
पाषाण अंतर हि क्रंदन खोल फोडी
दुष्टा अहा करिशि काय नराधमा रे
लागे प्रचंड करू ती मग हात वारे ॥ २२ ॥

पूरास तट्ट फुगल्यां सरिता क्रमाला
कल्लोलिनी अनुसरे तट फोडण्याला
प्राणा यमा जवळुनी हिसकाविण्याला
लागे करू कडकडून तडि द्रवाला ॥ २३ ॥
उत्तुंगती उसळली जशि कीं त्रिवेणी
विक्राळ विस्कट तसे अति दीर्घ वेणी
वाघीण ती मग म्हणा चवताळलेली
की आपटीत जणु शेपटि क्रुद्ध आली ॥ २४ ॥
संचार होय अबलेंत नव्या बलाचा
वर्षाव त्यावरि सुरू करि वाव शराचा
आंगावरी करितदंत नख प्रहारा
तोफे परी सुरू अजिंक्य असह्यभारा ॥ २५ ॥

दाबी गळा कचकचून नराधमाचा
जाई जणूं गुदमरूनच जीव त्याचा
कंठी ध्वनी निघत खोल दरी प्रमाणें
डोळे तसे गरगरा फिरवी क्रमानें ॥ २६ ॥
कैंची सुटे हळुहळू शिशुच्या गळ्याची
ती सोडवी मग मिठी मकरी करा ची
आरक्त नेत्र बघतो युवती पवित्रा
राही उभा त्वरित ठोकूनि तो पवित्रा ॥ २७ ॥
बाळास सोडि धरि धांवुनि माउलीला
ती पाहते विवश सजल लोचन पाडसाला
तो मारहाण करि , धरांतिज केशीं
बांधी तिला करकचून कृतांत पाशीं॥ २८ ॥
व्याधा परी हरिणिला जखडून टाकी
तो देवकीस जणु बंधनिं कंस टाकी
ती पाशवी प्रबल आसुर शक्ति किंवा
त्या देवतेस दृढ डाम्बुनी ठेवी तेव्हां ॥ २९ ॥

लोळे भुई वरति ती असहाय हाय
वत्साकडे विकल पाहत माय गाय
बाळा कडे पलिकडे पडली पहात
एकीकडे , जड शिले परि त्या वनांत ॥ ३० ॥

साक्षात् दिसे करूण मूर्ती मयी कहाणी
पृष्ठावरी मुखिं दिसे अति दीन वाणी
गंभीर शोक रस हृदयांत राहे
शब्द प्रवाहिं किति अल्प तिथून वाहे ॥ ३१॥

मत्प्राण तूं प्रथम घे अतिदुष्ट काळा
घे दागिने सकल तू पण सोड बाळा
त्याला करी विनवण्या वळवाव याला
नाना रितीं करित काकुलती खळाला ॥ ३२॥

पापास ही फुटत असे म्हणतात वाणी
जावो न कृष्णकृति ती कुठल्याहि कानीं
त्यांना म्हणून जगतांतुनि लांबवाया
झाला सुसज्ज शिशु क्रंदन थांबवाया ॥३३॥

दावी कसाब करणी अपली नवीन
मोठी शिला जवळची आपल्या बघून
तो ओणवा उचलण्यास शिलेस झाला
किंकाळि फोडत मिटून स्वलोचनाला ॥ ३४ ॥

त्या मांत्रिकें विवश बांधुंनि ठेवलेली
फोंफावते दुरुन नागिन भारलेली
आक्रोश तो शिशु करी तिज पाहवे ना
कांहीच ये न करिता पण राहवेना ॥ ३५ ॥
लागे म्हणून प्रभु ला मग आळवाया
आतां समर्थ कुणी अन्य नसो उपाया
तू तूच तू मज अनन्य शरण्य देवा
तू राख हा जपूनि कीं शिशु-रूप ठेवा ॥ ३६ ॥
ती आठवी हृदयिं द्रौपदि प्रेम धावा
ध्याई गजेन्द्र तनु मोचना
तू लाज राख म्हणते मम देव देवा
देवास ती विनवित्ये विविध प्रकारीं
आक्रोश ती व शिशु ही करितीं ( करीत असे ) अबला बिचारी
प्रार्थित असे विमल भाव वती सती ती
श्रद्धेत होत असते प्रभुची प्रतीती ॥ ३७ ॥
डोळे मिटून पद पंकज ध्याउं लागे
डोले तिचे विमल अंतर हृदय निर्मल सानुरागे
टाहो पडे श्रवणि तों हृदयाविदारी
आक्रोश लागत करूं अबला बिचारी ॥ ३८ ॥
त्या क्रंदने तरुलतांस फुटेल वाचा
किंवा शीला तट द्रवेल रवें शिशुच्या
हो वो न वेळ मुळिं दुष्ट म्हणे क्षणाचा
घालीत हात मग खालिं शिला तटाच्या ॥ ३९ ॥
मोठी शिला उचलली वरती शिराच्या
सोडावयास शिरिं सज्ज असे शिशुच्या
फूत्कार ये श्रवणिं दृष्टि ही खालिं जाई
पाहून नाग खल चित्तिं भिऊन जाई ॥ ४० ॥

कीं क्रोध पुंजित शिलातलिं होय तिचा
कीं मूर्त तो कठीण भाव शिलोदरींचा
किंवा शिले सहि फुटून विषारि वाचा
झाला जणूं उदय पाप समुच्चयाचा ॥ ४१ ॥
त्याच्याच कृष्णकृति राहुनि एक जागीं
होऊन एक तनुरूप वनान्त भागीं
झाल्या तिथें प्रगट ज्या बसल्या दडूनी
किंवा म्हणा बसति तेथ दबा धरूनी ॥ ४२ ॥

काळया शिला घनिं निघे जणुं जीभ वीज
किंवा असे अज्ञानि ती जणुं मृत्यु बीज
की नागपाश यम पाठवि बांधण्याला
ओढू त्यास नरकांतरि लोटण्याला ॥ ५० ॥

दोघेहि दुष्ट ,खल नाग तसे विषारी
चाले झटापट पहात सभीत नारी
तो आपटून करि उंच फणास ( फणेस / फण्यास) साप
याचा मनांत जिरला अमित प्रताप ॥ ५१ ॥

जो पारधी भीवविती हरिणी  कुरंगा
ते भ्याड अंतरिं खऱ्या असल्या प्रसंगा
जे दाविती निजबला अबला शिशु ते
त्यांचे चुली पुढिल शौर्य प्रसंगिं जाते ॥ ५२ ॥

जेव्हां दिसे प्रखरता अहि लोचनांची
तेव्हां उडे त्वरित घाबरगुंडि त्याची
चाले करामत न  युक्ती न कांहि कावे
खालीं गिधाड पडला मृतदेह धाड
फुंफाट तो  करित पन्नग त्यास चावे ॥ ५३ ॥

त्याचा विशाल पडला मग देह धाड
कोपून कोसळुनि पाडित वीज  झाड
जाऊन सर्प परतून परन्तु येई
निश्चेष्ट दुष्ट पडला तरी दंश घेई ॥ ५४ ॥

राहो न शेष मुळिं दूषित जीवनाचा
वाहो प्रवाह जननी शुभ भावनांचा
वाटे म्हणून करि दंश पुन्हा पुन्हां तो
खात्री करून मग तेथुन नाग जातो  ॥ ५५ ॥

अंधार जाय विलया जननीस वाटे
गेला लया प्रलय मेघ दिगंन्त वाटे

झाले तिथेच प्रगट वैभव चंद्रिकेचे
झाले प्रफुल्ल धरणी परि भाव तीचे ॥ ५६॥

संचार होय शरिरीं नवजीवनाचा
झाला सारा समुल्लसित प्रांत (भाग) दिसे वनाचा (मनोवनाचा)
ती चंद्र बिंब हसरें हंसुनी पहात
झाली तरंङ्गित सती आपल्या मनांत ॥ ५७ ॥

सोडून ती हळुहळु निज बंधनाला
वात्सल्य मूर्ति कवटाळित लाडक्याला
वाटे तिचा परत जीव जिवांत येई
उत्फुल्ल लोचन दिसे हृदयांत आई ॥ ५८ ॥

संयोग होय अतिसुंदर भावनांचा
वर्णील प्रेममय संगम कोण त्यांचा
कल्लोलिनीं कर तरङ्गिं लहान ओढा
जाई मिळून मिसळून स्वभाव ओढा ॥ ५९ ॥

झाले जसे कळविले न पटो पटोवा
हें ना पटेल कधिं नास्तिक क्षुद्र जीवा
जेव्हां अतर्क्य असल्या घडतात गोष्टी
तेव्हां कळे किति चमत्कृत दिव्य ईश सृष्टी ॥ ६० ॥

संसार तारक असे जरि तारणारा
तो काय कीं करिल निर्दय मारणारा
साऱ्या गुहा शयिं सदैव विराजणारा
कोठें तरी बसुनि कारण गुंफणारा ॥ ६१ ॥

दावून कार्य स्वयमेव अदृश्य राही
त्याची कळे न गति दृश्य जगास कांही
केव्हां तरी जगति येति असे प्रसंग
त्याचे न कारण कळे मति होय गुंग (दंग)

त्याची कशी विविध साधन सूत्र माला
नाहीं मुळीच कळली कधिंही कुणाला
जाणीत मानव निजेंद्रिय जन्य ज्ञान
तो आपणास समजो किति मी शहाणा ॥ ६२ ॥

चैतन्य जें विखुरले जड जगतांत
झाले तमोगुण निधान शिलोदरांत
खांबा तुनी प्रगटला नरसिंह जैसा
बाळास रक्षे दयामय नाग तैसा ॥ ६३॥

संसार सूत्र धरुनी रथ हांकणारा
घोडे तया रवि शशी जणुं जोडणारा
रश्मी करीं धरूनि सारथि हांकि गाडी
त्याची कधी उधळती नच गाडि घोडीं ॥ ६४ ॥

अक्षावरी फिरत पृथ्वी ठरीव कक्षी
त्याच्या वरील बसति प्राणि मनुष्य पक्षी
सारा असा रथ नियंत्रित चाललाहे
( चाले नियंत्रित निसर्ग प्रकार सारा )
त्याच्या रहस्य गतिला विरळाच पाहे ॥ ६५ ॥

नाना तर्क कुतर्क कोणिहि करो किंवा टवाळ्या करो
निंदो कोणि कवीस देवि प्रतिभे मन्मानसीं तूं स्फुरो
नाना दिव्य रम्य सदैव दैव घटना होतात ज्या नेहमी
त्यांना वर्णिन भावयुक्तकवनीं मी राम घेतो हमी ॥ ६६ ॥

# शेंदाड शिपाई

(आपल्या ब्रह्मचारीपणाची ऐट मानणाऱ्या शिलेदारास उद्देशून)

१७.०९.१९३६

कुठें गेला शिलेदारी तुझा डोळा मरायला
तुझा बाणा तसा गेला कुठें तो बोंबलायाला
किती शेखी किती वेळीं किती तू दाविली ऐट
क्षणार्धा आत सारी ती कशी गेली दिगंताला

न डोळा पाहिला होतां तुवा तो प्रेम भावाचा
तुझी गर्वोक्ति शौर्याची कुठें गेली जळायाला
अशा डोळ्यांत शक्ती भावनांना जागवायाची
म्हणून रात्रिं ना लागे तुझा डोळ्यांस तो डोळा

असा तूं भाळला कैसा अशाया प्रेम पाशांत
कसा फांसा पडे द्यूतीं तुझे सर्वस्व घ्यायाला
तुला वाटे न जिंकूं की शके कोणी मला प्राणी
नदीचा ओघ तो फोडी अभेद्या पर्वतान्तला

तुझा तो पाड शेंदाडा शिपाया कायरे येथे
चुलीच्या दाव की आतां पुढे साऱ्या प्रतापला
तपस्वी मोठ मोठाले मुनी झुंझार ही देव
गळूनी गाळती जेथें रच धैर्या हात पायाला

असो झाले अतां झाले करी ना मानसी खेद
शिरा दे उखळा मध्यें पडू दे तेथ घावाला

# ग्वाल्हेर गीत

२०.०९. १९३६

(प्रिय अमुचा एक महाराष्ट्र देश हा )

हिंद भूमि हृदयमध्य रम्य मंदिरीं,
प्रिय अमुची गालव भू भारतान्तरी || ध्रुव.||
शिंदे कुल शूर वीर कुशल भूपती
मंगलमय मंदिर संस्थान निर्मिती
रंगविती विविध रीति तत्कलाकृती
श्री माधव कळस चढवि नृपती सन्मती
उदयाचल सिंहासनिं बाल रवी परी
उजळवि जय जय जय नृप मंदिरा करीं
रुचिरा ही गालवभू मालवस्थळी
विविध वन्य भाग डुलति तरुलता तळीं
क्षिप्रा कीं  वेत्रवती रुळती हृत्स्थळीं
भूषित तनु चंदेरी धवल पातळीं
चंबल जल उडवीत असे मस्तकीं जणुं चंवरी
रेवा ही धूत पाय आपल्या करीं

Footnote १. मध्य हिंदूस्थानांतील ग्वाल्हेर संस्थान रूप मंदिरांत

मानव कृति आणि प्रकृति शिवपुरी वनीं
खेळति अंगणिं सख्या†[1] प्रेम जीवनी
माधवनृप निर्मित त्या रम्य मधुवनी*[2]
झरझरती प्रकृतिभाव निर्झरांतुनी
तनय करी ताण तिथें प्रकृतिच्या वरी
जननी ची मूर्ति बघत द्रवित अंतरीं
जिच्या अंगणी श्रीरंग खेळला
कालिदास भावना प्रवाह वाहिला
जटिल महाकाल वनीं झरझरावला
क्षिप्रेचा गंगे सम ओघ चालला
मोक्ष मंदिराचि सहावीच पायरी
धन्य कन्यका हिची अवंतिका पुरी

Footnote †[1]. सख्या=मैत्रीण व श्रीमान सख्याराजे महाराज
*[2]. मधुवनी=मथुरा

पूर्वि 'महाराष्ट्र' सार्थ सर्व मानिती
तत्प्रताप सूर्य कांती अखिल भारती
मावळे  लयास जाति मावळे द्युती
संस्थानी क्षितिजावर उरलि तत्स्मृती

पश्चिमा क्षितिजावरील द्युति खरोखरी
दावीतसे पूर्व वैभवा उषेपरी

हे अमुचे पूर्व शौर्य धैर्य स्मारक
क्षितिजा स्थित तारक सम स्फूर्तिदायक
भारत भूमि  जननिकंठिं एक हीरक
अमचें जर काहिं म्हणायास  लायक
विकसलि ही वाळवंटिं  हिरवळी उपवनापरीं
प्रिय अमुची  गाळवभू भारतान्तरीं

रवि परि 'जय' नृपति  चढो  गगन शेखरीं
पूर्ण चंद्र सतत असो हर निजांतरी
तेजें हा प्रखर, सौम्य मानसीं परी
राहो हा अचल सतत सत्पथा वरी

जीवाजी जीव प्राण राज्य मंदिरीं
पाळो प्रिय गालवभू पूर्वजांपरी

२०.०९.१९३६

पत्रांत भेट म्हणती कुणि अर्धि होते
फोटोत पाउण पटासह पत्र येते
होईल पाव उरली महिनाअखेर
आश्वासनांत धर सुंदरि नीट धीर

पृष्ठ क्रमांक ४३
०३.१०.१९३६

**ईश स्तवन**

असशि  कुठें बघशि  कुठूनि कळत असे न अंतरीं
कोणि म्हणति बसशिं गगनि म्हणति कोणि त्यावरी
म्हणती चंद्र सूर्य नयन| शरिर तुझे अखिल गगन
रंध्रेंवर अमित भवगण|  मधुन मधुन स्फुरति मेघ हृदयिं (वृत्तीच्या ) परी
म्हणति तुझे पवन श्वास | विकसन हें म्हणति  हास
प्रकृति विकृति तव विलास| प्रगट होति सृष्टि हृदय विमल अंगणांतरीं
राग तुझा प्रबळवात|  धरणि कंप व उत्पात|  क्षुब्ध  पंचतत्वजात
धगधगती ज्वालाही कठिन पर्वतोदरीं
गाढ झोंप म्हणति प्रलय| पावत असे स्थिर चर लय| नयन उघडतांच उदय|
सकलसृष्टि  प्रगट होय अगदिं ती नव्या परी
विराट रूप हें महान |कोण करिल तदिय ध्यान| रूप घे प्रभो लहान |
प्रगट हो इथें तुझ्या सुभक्त हृदय मंदिरीं
वांङ्मय जें वर्णु शके| कवि सर्वा सांगु शके |चित्रकार काढुं (दावु) शके|
घेऊनि तें रूप; काढ ,पटल लोचना वरी ।

३.१०.१९३६

# स्वागत गीत

स्वागत स्वागत सर्व जनालां
वांग्मय सन एक सद्वृंदाला ||ध्रु.||

काय कुणाला आम्ही द्यावें
आगत स्वागत काय करावें
प्रेमें केवळ कर जोडावें
माना त्यातच सत्काराला ||1||

वाङ्मय मंडपिं वाङ्मय सेवन
वाङ्मय येथेंच भोजन जीवन
वाङ्मय सत्कृति चरणिं समर्पण
घ्या घ्या नवरस सद्भावाला ||२||

क्षिप्रेचें हें पावन जीवन
निघून शिवाच्या जटिल वनांतुन
वाहत झरझरुनी रात्रंदिन
तिच्या लहरि जणुं वाङ्मयाला ||३||

तिच्या तटावर वायू निर्मळ
तिच्या पायाचे पान सुमंगल
अतिथि शिशूंना प्रेमें तर्पिल
देइल शांती श्रांत जिवाला ||४||

## चिंधू भैया

(इंदू -मुलगी खेळवीत आहे चिन्ध्यांच्या बाळाला)

चिंधू राणा
गोजिरवाणा
बाळ शहाणा
खेळविते मी त्याला
माझ्या छोनुकल्याला
किति बडबडला
रड रड रडला
ढोसूनी मजला( पी पी प्याला )
निजला बरं का ताई
करुं  दे त्याला गाई
चिंधू भैया
उठला? या !या !
आले घ्याया
दुडु दुडु  धावे इंदू
उठला बालक चिंधू
घे, घे, जीजी
उठली तुझी
सिंधू बघती
दूदू देण्याया
मी घेते चिंधू भैया

घेते घुटिची
डबि लटपुटिची
काजळ लावी
भाळीं खुलली तीट
चिंधू च्या ती नीट

उगि उगि बाळा
बघतो आला
बागुल बाबा
अग दिन हा राही
चिंधू मुळि गऽ ताई

**कां ना आला बाल राजा ?**

ढळल्या कीं हो तीन्हीं सांजा
 कां ना आला बाल राजा ?
 असली कसली मेली शाळा
 उशीर झाला माझ्या बाळा

गाडी घोडे जाती वाटे
माझ्या चित्ती भीती वाटे
 गोठ्या मध्ये आल्या गाई
करू मी आतां काय बाई ?

 पक्षी पहा वर घरट्यांत
चोचीने खग  दाणे खाती
 प्रेमाची ही गाणीं गाती
(घरट्या मधुनी चोंची दिस् ती,  गज् बज् ली मग घरटीं वर् ती )
माझ्या गोकुळिंचा हा राणा
 कोठें आहे माझा कान्हा ?

माझ्या जीवाचा विसावा
लव् कर्  देवा आता यावा
ओटी भ् रि् न ग  अंबा बाई
येऊ दे पण बाळा बाई

 जेथें माझा कृष्ण कन्हैया
 त्यावर करि तू तेथें छाया ।

झाडांच्या या फांद्या लवती
वाटे बाळाला बोलवती
हंबरडा ही फोडे गाय
आला माझा वत्स काय ? (हाका मारी बाळा)
बोले मैना बोले राघू
आला काय माझा राघू ?

वाजति आतां पाऊलें ही
कानीं येई ' आई आई ' !
आला वाटे माझा तान्हा
प्रेमाचा तिज फुटला पान्हा
उशीर कारे बाळा झाला ?
मांडी वरती बसवी त्याला

प्रवाह वाहे मधु शब्दांचा
झाला संगम दोन जिवाचा
ओढा भेटे सरित्तरंगा
हरिणी भेटे बाल कुरंगा
जिवा- शिवाची भेट झाली
ब्रह्मानंदीं लागे टाळी

# आले आले उंदीर मामा ।

(मोठी भाची छोटे मामा)

आले आले उंदीर मामा ।
घरात करती सगळया कामा
(बालचमुचे दळ हे हाले )
त्यांचे जेव्हा दळ कीं हाले
(सांडलवंड ही घरात चाले)
घाबरती मग पहारेवाले
(सुलटे सगळं उलटे झाले)
हे उचला ते उचला चाले
म्हणती काय करावे रामा
झाकापाक कितीहि करावी
तरि पण 'पिंपळि' त्यांत दिसावी
कणिके मधुनी उदरीं जावी
पोटें फुगती धावा रामा
सैरावैरा धावे सारी सेना
(रात्रीं करिती विविधाहार विहारा)
(घालिती किति धिंगाणा)
खडखड धडपड सरसर ध्वनि ये कानां
सैरावैरा धावे सारी सेना
(सैंपाक घरांत) रात्रीं घालुनि किति धिंगाणा
गमन करिति ते मग निजधामा
(जाती मग ती जणुं निजधामा)
झोपेमध्यें स्वस्थ निजावें
कष्टानानें हळू डिवचावे
आंगठ्यास मग घ्यावे चावे
विवळत उठतां म्हणती रामा

भांडीं सारीं ते कुरतुड़ती
आंत डब्याच्या ते लुड़बुड़ती
कपडे पुस्तक ते टर उडवती
जेरीस येती सारे रामा
म्हणती शेंदूर फासा एका
म्हणती कोणी पाळा बोका
उपाय सुचवतो ज्याला जो का
करितां, कांहि न येई कामा
हल्ले यांचे नाही थोडे
त्यांना बघतां कंबर मोडे
थोडें थिडके नाही घोडे
आवर गणरायां निज सेना
बिळात पळती मारून डल्ले
त्यांचे दिसती अभेद्य किल्ले
कोण चढवितो त्यावर हल्ले
छापे मारिती त्यास न सीमा
घरांत वस्तू जरिका हरवे
शोधा बिळे ते तुम्ही बरवें
त्यांचा कोणा हात न धरवे
देवी माझी पळवी जि रामा
कधीं लढावें कधी पळावे
युद्धनीतिचे त्यांचे अगणित कावे
मोठ्या मोठ्यांनेहि शिकावे
डौल व्यर्थ करि मनुज रिकामा
पुरुष मुलें वा किंवा बाई
जो कोणी ही कविता गाई
त्याला उंदीर भय तें नाहीं
गणपति सांगे स्वप्नीं रामा

सहन कसा करू भार
दुबळया खांद्यावर हें ओझे वाटे अमित अपार
कोसळती हे डोंगर करूनी दुःखाचे अनिवार
काहुर उठलें, दिसेना कोठें काडीचा आधार
रस्त्यामधें धूळ दाटली कांहि दिसे ना पार
धुकें दाटलें नयनां मध्यें अश्रूंचा संभार (खळली नयनिं न धार)
आशा किरणें लपली सारीपसरे जगिं अंधार
दिशा भूल ही झाली माझी स्फुरती मुळिं न विचार
खिळ खिळ लागे अवेळिं पथिं हा जीवन रथ परिवार
आतां तूच तू मार्ग दाव मज कळे न सारा सार
जुळुं दे माझा विस्कटलेला सारा हा संसार
हांक तुझ्याही कानीं जावो घे तू माझा भार
संकटमोचन (होवो प्रभू चा मंगलमय अवतार)
वर्षूंदे सुखमय जीवन (आ)धार

जागे व्हा भारत उपवन वासी
झोंप लागली काय तुम्हासी
नकळत  कोठुन कोणी शिरले
नंदनवन हें उजाड झाले
होते नव्हते सगळे गेले

नागवलीं ही झाडें वेली ..... (अपूर्ण)

१३.१०.१९३६
चटक चांदणी चमक तुलाही दिपवी तरुणा फार
क्षणभर तळपुनि तव  संसारीं पसरिल पण अंधार
तुला वाटते कल्पलताही
कोमलतामय करुणामयही
 हिची सावली मंगल दायी
हिचे श्वास ते पवन प्रवाही

 फुललें वाटे तुज नवयौवन
फुललें वाटे लता कुंजवन
 सुंदर परिमल जाय दरवळून
तरल तरङ्गित विकसित नयना आंत वसंत विहार
दशादिग्व्यापिती श्वास हिचे तुज वाटति प्राणाधार

वाटे तुज ही तव जीवन नौका
करितेपणही ते दूर चाळे
डुलु डुलु डोलत डौले चाले
 हृदयधरातल तूझे हाले
धरणिकंप हा पण रे पाडिल उलथुन तव संसार
हि दृष्टी बघ विषमय चंचल
 हिचें हास्य हें परम अमंगल
विषमय श्वासा हिचे
 हिच्या हृदजलधिंततिंमंगल
 भलत्या तरुणीवर भाळिशि तू
 आवर तरल विचार
 उच्छृंखल ही उन्मद बाला
 सोडितसे ही कटाक्ष माला

वेधूनि तूझा तरुण मनाला
 करील खरी ही चूर सर्व तव अभिलाषा  परिवार
 समतोल हृदयिं असतां पहिली
 निवड तुवां जी बरवी केली
 मुख वृत्ति तू  तेथें अपली
 दारुण विकार वश तूं गेला विचार सारासार
नसुं दे नटणे तसे मुरडणें
 नसूं दे मानींचे नाचवणें
 ठुमकत ठुमकत लचकणें
 रुचिर सुशीला वधू करो तव मंगलमय संसार
माझे दिन रे थोडे उरले
 माझे गाडी घोडे थकले
 योग्य वाटले तुला कळवले
 म्हाताऱ्याची अनुभवा वाणी.  वर्षो पीयुषधार

जोगी आले एके वेळी
उभी राहिली दारी टोळी
मागति काहीं द्यावे खाया
बघुनी त्यांना म्हटले या! या !
आले घेउनि भिक्षा घ्याया
पसरति अपली अपली झोळी
त्यांची उज्वल कांती बघुनी
कणिक घालुनी पाणी पाजुनि
जोडी आपल्या हाता दोन्ही
मी तर अगदी भोळीभाळी
घरांत येउनि बसले सगळे
ठाउक नव्हते मज हे बगळे
काहिं न कांही मागत सुटले
त्यांची चाले सारखि टकळी
नव्हते तेथें घरचें कोणी
त्यांनी केली कांहीं करणी
अर्पित सुटले त्यांच्या चरणीं
दाग दागिने त्यांना देउनी
माझी वृत्ती कशि बावरली

# ज्ञानेश्वरीचा अभ्यास

(अध्यात्म विद्येचा अभ्यास )

१७.१०.१९३६

( अध्यात्म मी शिकावें )

ज्ञानेश्वरी शिकावी आहे तो चित्तिं आला ||१||

शिष्यीण आपली मी अज्ञान एक बाला ||२ ||

ज्ञानेश्वरास माझ्या साक्षात् विनंति माझी ||३||

गुरुदेव भक्ती ने मी आले शिकावयाला ||४||

तुम्हा विना न कोणी संसारिं योग्य वांटे ||५||

इच्छा पुरी कराया मज मार्ग दावण्याला ||६||

खाते गटंगळ्या मी भवसागरां तरंगीं ||७||

मज जीव हा नकोसा आतां खरेंच झाला ||८||

आहे कठीण पोथी ज्ञानेश्वरी चि देवा ||९||

विषयांना अन्य कोणी मज योग्य सांगण्याला ||१०||

(अध्यात्म ज्ञान आहे म्हणती अती कठीण विषय या विषयात अन्य कोणी मज योग्य सांगण्याला)

पसरा दयामया  हो अपल्या कृपा कराला ||११||
बुडत्यास हात द्यावा म्हणती तरावयाला ||१२ ||
मी धन्य आज झाले गुरु चा प्रसाद होई (लाभला )||१३||
पटलास काढूनी जो मज दावि दिव्यतेला ||१४ ||
संसार बीज भावांतिल मर्म जाणिले मी ||१५||
आनंद मूर्त माझ्या हृदयांत एक झाला ||१६||
या मैत्रिणी बघाया बसले कुठें असे मी (हा )जीव झाला ||१७||
सिंहासनावरी मी गुरु रूप होय बाला ||१८ ||
उरले मला न कोठें कांही शिकावयाचे ||१९||
आले मला सुखाचे दिन या बघावयाला ||२०||
वैषम्य खेद किंवा वाटेल ज्यास वाटों ||२१||
आनंद मग्न मी ना  पर्वा परवा मुळी मनाला ||२२||
(वृत्तींत वृत्ति मुरली ज्ञानेश्वर प्रसाद)
मी त्या दिगंबरा गुरु ची प्रसाद छाया  ||२३ ||
 पावून,  तुच्छ  आज लेखी या कुत्सिता जगाला ||२४ ||

काव्यांतील रहस्य भाव (अर्थ कळतां) स्फुरतां  हृत्सागरीं अंतरीं
जाई सौरभ तो भरून

भुरभुर उडती शिरीं जावळें
बाळ अआंगणिं तुरुतुरु चाले
तुरु तुरु चाले आंतिल जिभली
त्याची भाषा कुणा न कळली
हृदयीं पण ती सहज प्रगटली ( उमजली)
गुलुगुलु मधुवचन तो बोले

पृष्ठ क्रमांक ६३

३१.१०.१९३६

(ज्याला काहिं जवाबदारी न असे घरीं तो मंद भागी असे )
ज्याला  बंधन काहीही घरिं नसे चिंता न चित्ती असे ज्याला कांहिं जवाबदारि न असे तो मंद भागी असे
ज्या आकर्षण कांहिंही न (कुठले )कसले वाऱ्यापरी तो फिरो
जावो तो भटकावया सहलही मित्रांसवें तो करो
सृष्टीची रमणीयता उपवनीं किंवा वनीं पाहुनी
क्रीडो पर्वत पंक्तिच्या वर, रमो पक्ष्यांचि या गायनीं
मारो खोल बुडी नदीत विहरो चित्तामधें हर्षुनी
मानो आपण धन्य मी, लहरिनें घेतां तिच्या झेलुनी
ज्याची (साक्षात् ) सृष्टीमयी घरांत गृहिणी

आनंदसन्दोहिनी
आनंद तो निज नंदनोपवनिं तो संतृप्त राही मनी
त्याची वृत्ती कुणा परी न (भटके) बहके, बाहेर जाया तरी
सारे सृष्टी विहार, एक वटती प्रेमाचिया (मंदिरिं) अंतरीं  ( या घरीं)

क्रीडा निर्झरणी स्वतां अवतरे येथें अशी ही जरी
मित्रांनों तुम्हि जाच, राहिन असा मी आपला हा घरी

(६.११.१९३६ च्या केसरीत ग्वाल्हेर महाराजांच्या भाषणाच्या आधारावर)

सात नोव्हेंबर ३६. ०७.११.१९३६ ला लिहिलेली

आश्वासनें नृपाळा तुम्हिं जी दिली प्रजेला
वाचून केसरीच्या अंकांत ये उमाळा
वात्सल्य त्यांत भासे त्वद्भाषणांतरंगी
पोटी प्रजोहित हिताचा दिसला तिथें जिव्हाळा
खेड्यां कडेहि वळली तवदृष्टि वाक्प्रवाह भाव गंगा
तीचे प्रवाह वाहोअर्पोत मङ्गलाला
मोठे गरीब किंवा सगळयास न्याय दृष्टी
पाहिल, वाचुनी हें रोमांच देह झाला
लोकांचिया शरीरा लोकांचिया मनाला
जपणार काळजीनें करुनी सुधारणेला तुम्हिं हो तयार झाला
ग्वाल्हेरच्या प्रजेचे तुम्हि जीव हो जिवाजी
उठतात या प्रसंगी हृदयीं तरङ्ग माला
मोत्यांचिया ओळी जणुं दिव्य वाक्यमाळा
अर्पी प्रजाजनाला जगि धन्य मोतिवाळा

श्री माधवें दिल्या त्या किति देणग्या प्रजेला
सर्वांत श्रेष्ठ वाटे मज सत्पुत्र मोतिवाला
वर्षामधें हजारो दिनते दिनते प्रभो! असावे
शतवर्षपूर्ण लाभो हा धन्य मोतिवाला

या ,या,या,म्हटले म्हणून घुसला (शिरला) अंतरगृहाच्या मधें
शिरला कांहो आंत
बसला होतां दारिं  दमुनि तुम्हि म्हटले 'या, या, आंत'
होते जे तें चरणिं वाहिले
मग मी बघतच उभी राहीले
सारे घर पण तुम्हि हो धुणले
तुम्हां वाटते एकटि मी कां कोणि न  काय घरांत
लुटलें माझें सारे वैभव

(माजे) उठला हा हा कार
नवसंस्कृतिचा प्रबल प्रभंजन सुटला हा अनिवार जलधिंत नांवा भटकत फिरती
पुरुष आणि स्त्री मनि गांगरती

दीनदृष्टि ती वळविति वरती
गगनिं, मंदिरिं देवि देवता गाळति नयनीं धार
वणवा पेटे संसारान्तीं
लयास जाई सात्विक शांती
तमो गुणाची सुरू प्रवृत्ती
उंच उसळती स्वार्थी लाटा खळबळ झाली फार
'राहु नये जगिं दीन दुबळें'
नीति बळवत असली चाले
गरिबा वरती घालती घाले
गरिबा तू केवळ वाली प्रभू तू जगदाधार

जो कोणी करितो निगूढ  हृदया आंतील संशोधन
तो संशोधक नाहिं काय मुळिं ही
किंवा जो बघुनी निसर्ग नियमा भावांतर भावतरंगात लया शास्त्री तो न च काय ?

**आकाशांत प्रवास** मंगल चिंतन तारीख २०.११.१९३६

दासोपंत सुता सुसंस्कृत वधू  जी दासवाणी परी
बोहोल्यावरही उभी शुभमुखी  शोभे वधू सुंदरी
श्री मंगेश तनूज शंकर वरा  घालीत माळा गळा
वर्षूं द्या करुनी वधू वर शिरीं  मुक्ताक्षता मंगला
आहे आज उजाडला दिवस तो  वांछा जयाची मनीं
झाले धन्य सुयोग एक वटुनी  पुण्याश्रमी  पावनी अन्योन्य  सम्मीलनीं
वाटे आज प्रयाग पुण्यपूर हें  गंगा जिथें मंगला (निर्मला )
होई तन्मय श्यामजीवन रसीं  पावे (संगमिं ऐक्य) ती परमैक्य शामल जलीं (
यामुनरयीं)  कार्या करी  मंगला

हा अन्तःपट लौकिकार्थ धरिला  दोघांत कांहीं क्षण
दृष्टी द्या तुम्हि स्वस्तिकाकृतिवरी  स्वत्यर्थ दोघेजणं
जातां कीं पट हा  प्रमोद प्रगटो अद्वैत जीवांतला (भावांतला)

संसारात विवाह भाव असला  कार्या करो मंगला
विद्युज्ज्योति करें धरी  घनजसा दिव्य प्रवासा करी
हिंडे शंकर  घेउनी शांभवि हिला कैलास भूमीवरी
तैसा आज प्रवास नूतन  (सुरु) करा
संसार मार्गांतली
दोघे हात धरा , बरोबर रहा (असा)
कार्या करा मंगला

आयान्त्वद्य दिने मुहूर्त घटिका दांपत्यभावाश्रया:
आयान्त्वद्य सुराः कलत्र सहिताः प्रोद्भासयन्तोदिशः आयान्त्वद्य कुटुम्बिनः
सुरभिभिः हीरैः सुमानांयुताः
सौरभ्यम वितनुतां हृन्मंडलें मङ्गलम्

**उभयता वधू वरांचा हितचिंतक**
**रा. वा. पंतोजी**
**माधव कॉलेज**
**उज्जयिनी**

# मानवतेचे सिंहासन

(हा पाय मळका ठेवुं मी का दिव्य या सिंहासनीं
कधीं जेथ बसले मोठमोठे भूप ऋषी आणि मुनी
बत्तीस लक्षणयुक्त पुतळ्या बोलु ती बत्तीस ही
किंकिणी परि शब्द झणझण येत कानाच्या वरी )

पाय मळका बावळ्या हा आंवरी तू आंवरी
दिव्य या सिंहासनाची चढुं नये तू पायरी
बत्तीस लक्षणयुक्त पुतळ्या बोलती बत्तीस हें
किङ्किणी परि शब्द झण् झण् येत कानाच्या वरी
येथ पुतळे सद्गुणाचे विक्रमादी भूपती
शोभले; रे (तू तेथ धाष्टर्य कैसे करी) धन्य तूझे धाष्टर्य धैर्य वाटे अंतरीं

०७.१२.१९३७
रात्र जाहली नऊ वाजले
जिन्यात पाऊल कुठें वाजले
(उठूनी दारे ताड उघडले)
उत्सुकता ही मनीं वाढली
अंतरी वृत्ती ही खळबळली
उठूनी दारें ताड उघडली
नयनांचे ही दार उघडले

हृदय स्वामिनीच्या सत्कारा
कर पसरूनि गेलो सामोरा
सासरा दिसेपण म्हातारा

झाले मग मम मन हिरमुसले
हताश होउनि परतुनि पडलो
इकडुनि तिकडे शयनीं वळलो
सासू जीजी दिसतां पुन्हा पुन्हा मी कितिदां फसलो
एक ठिकाणी मन पण खिळले
कांहि राग अनुराग (प्रवाही )हि काहि
संतापहि अनुतापहि पांहीं
सत्व रजो गुण (रजस्तमगुण) मिश्र प्रवाही
अंतरजग मग त्यांत बुडाले

कुठें वाटले पडले रानीं
 वारा फसवुनि गाई गाणीं
हळुहळु कंकण ध्वनि ये कानीं
उत्सुक  मन मग माझे झाले
 मंद गती त्या संगीताची
ओळख पटली मज रागाची
 मिळवणि झाली ताल सुराची
 तन्मय मानस माझे झाले

## **नवजीवन प्रभात** (रात्री झालेल्या पुत्र जन्मानंतरची प्रभात)

संसारी मन फार भटकले (बहकले)
जगतिं सारे शून्य वाटले
दुपारिं चित्तीं धुकें पसरले
खोलींमध्यें मेघ दाटले
गगन वाटले मला फाटले
परंतु दिङ्मुख हळू फांकले
क्षितिजी हळु शशिबिंब उगवले
रजनिंत अंतर्भाग उजळले

पहाट झाली नभ फटफटले
मेघतमाचे पश्चिमिं वळले
दार उजळले घरही उजळले
आशा पटलीं चित्र उमटले
चित्रामध्यें रंगहि भरले
रंगां मध्ये तेज विरले
तेजाचे मग किरण पसरले
हृदय उजळले
वदन उजळले
दार उधळले

घरहि उजळले
कलिका गुच्छहि उपवनिं फुलले
मंगलमय मग वारे सुटले
वासें उपवन किति दरवळलें
वात्सल्याने मानस भरले
तें गद्गदले तरङ्ग उठले
नेत्रा वाटे मग खळ खळखळले
सर्व जगत् मग त्यांत बुडाले
तन्मय माझें जीवन झालें

एकीला अति खोकला तळमळे तापांत कन्या दुजी
भावाला हिंवताप अति त्यांत, समजू ही योजना का तुझी
आजारी  भावाला हिवताप आजारी कुणि पाहुणे प्रगटती अत्यंत ते दुर्मुखी

आई वृद्ध, अशक्त भावजय ही पत्नीस डोंकेदुखी
साधूनी जणु  संधि,  वात शिरला संधीतुनी वेदना
ती पाही शिशुला दुरून ,स्फुरल्या,चित्तांत संवेदना
येतां  ना वळतां मुळी कृशि वरी,' घ्यावे कसे बालका'

(पाळी) याचि लयासे ती वदतसे 'देवा जगत पालका'

मानू मी काय रहस्य पूर्ण असती संसारिं च्या यातना

यातूनी स्फुरतील काय कविता ज्या तोषवीती मना

होतां मंथन सागरांत निघती चौदा हि रत्नें नवी

दुःखांतून सुखें अशीं प्रगटतीं ती कीं  म्हणुनी हवी

देवी तूं प्रतिभे अशा समयिं ये हातास ठेवी शिरीं

आनंदोर्पित नाचुनी विकसुंदे मद्भावना मंजिरी

(जाति उद्धव )

(कां  न कुंकुम कपाळीं
बोले मनिं व्याकुळ बाळ
पुन्हां पुन्हां डबि पुढे ठेवि
पण.. )
पूर्व दिशेचे
अरुण धांवुनी  ये बाळ ,
नभिं  झाली भव्य सकाळ
पूर्वेचे सजवि कपाळ
वर उडतो लाल गुलाल
युवती करिती वेणि फणी
मंद समीरण...

सळसळली पानें तरुची ....

अभंग

नीरसा पदार्थां येते फार गोडी
ज्याची त्याची जोडी जुळतांना
मंजुल तानेला ताल ही मिळाला
एक रस झाला श्रोतृ वृंद
षड्रस वस्तूंचे प्रमाण मिळालें
तृप्त सर्व झाले जेवणारे
कल्पना मिळाली सरस भावाला
आली शब्दार्थाला फार गोडी
स्वार्थ परमार्थ एकतांच येतां
जीवन संगीता गोडी येई
प्रकृति पुरुष क्रीडा खेळि मेळी
ब्रह्मानंदीं टाळी लागतेच

घेणेंदेणें चालू संसारीं बघावे
एक हातें द्यावें तुझ्या   घ्यावें
 मेघ घेई वरी पिउनीया समुद्राचें पाणी

# मुद्रिका

कुठें आजवरि राहिली बाळ इंदिरे
कशि अशी(गेलिस)  एकटी जाया
त्वदंतरिं धैर्य बल संच रे
कुणी विझविला शिरुनी चिमुकला दिवा
कुणी कडुनि तो शिरला ग बागुल बुवा
काळोख पसरला तेव्हां
प्रवास ग केला नवा
विझविला घरांतिल दिवा
रवि शशि किंवा मार्गांत तुजसि भेटले
कर धरूनी कीं तुज त्यांनी

इंग्लिश मध्ये मजकूर आहे
टाइम्स ऑफ इंडिया..
'Times of India ' dated . March 18,1937 page 11
Berlin Warning

"We must grind our swords sharper because that will be the best guarantee for the maintenance of peace ", declared Gen Goering addressing an ministry in honour of the second anniversary of the restoration of conscription

**पाजळली तरवार**
राष्ट्रा राष्ट्रांनीही आतां पाजळली तरवार
शांती जगांतिल राखायला पाजळली तरवार
स्वतंत्रतेची रक्षा करण्या पाजळली तरवार

आहांत हो 'माणके ' माझिया (पारखी ) या (तुम्हीं माझिया ) हिऱ्याला तुम्ही माणिकाला जपावें

पाडून पैलू हिऱ्यांतील तेजा निसर्गांतल्या मूळच्या वाढवावें

मी आपल्या दिव्य ठेव्यास ठेवूं महांलांत रंगीत का आपल्या या

जागा नसे त्यांत मी हे न मानी जिथें चालतें पाहुण्यांनाहि 'या ! या! '

नाहीं कुणी पाहुणा बाळ माझा तुम्हाला ; असे तूमचा अंश सार्थ (आपलाच)

भिन्न प्रवाहांतल्या एकतेच्या तरङ्गातला मानणें लौकिकार्थ

खेळे नसा आंत जें आपल्या कीं तया जीवनाचेंच यांच्यात पाट
तेजें गुणें ना उणें बाळ माझें दिसे माणक्यांचीच ती ऐट थाट

जो जीवन ग्रंथ तुम्हीं लिहीला तयाचेंच हें बाळ कीं एक पान

कीं वंशवृक्षांतल्या आपल्या हें डहाळी वरीचें नवेँ फूल, पान

२७.११.१९४४
(जन्म फाल्गुन पहाटे साडेचार वाजता
चि. सौ. प्रभा ची मुलगी 'चि.माणिक' (वय ८ महिने) तिचा फोटो एक पूर्वी आला व एक तिच्या मावशी ( चि. सौ. किशाताई) करितां ती माहेरी आली असतांना आला. दोन्हीं फोटो पाहून विशेषतः दुसरा अगदी उघड्या आंगावर सजवलेल्या भूषणांसह 'बाळकृष्णा' सारख्या दिसत असलेल्या माणिक चा फोटो पाहून सुचलेली कविता
तारीख २७.११.१९४४
अभंग
॥१॥
देव्हाऱ्यांत आहे पितळया चा देव |
ज्याला म्हणा 'जेव' , जेवीना तो ॥१ ॥

नैवेद्याच्या मध्यें पाणीही पाजावें |
तरीही न प्यावें देवरायें ॥२॥

आरती करा कीं लावा उदबत्ती|
तरी नाहीं तृप्ती देवराया ॥३॥

भक्तीनें तयाला किती आळवावें |
किती गुण गावे निरर्थक ॥४ ॥

हिरे माणिकांनीं सजविला देव|
चैतन्याची ठेव पण नाहीं ॥५॥

मनाला मिळेल ना मुळीं ही आनंद |
आनंदाचा कंद म्हणे ' राम '॥६॥

॥ २॥
अशा देवराया कशाला भजावें|
कशाला करावें जप जाप्य ॥१॥
घराचा गाभारा खरा हा देव्हारा |
प्रभामय सारा अंध..*.॥२॥
बाल बालिका या देव मूर्ति आहे|
ज्याने मन मोहे...*. ॥३॥
हिरे हिरकण्या चैतन्याच्या खाणी|
बोबडी ही वाणी...*. ॥४॥
बोलत्या रांगत्या देवतां च्या लीला|
मनीं कुसुमाला फुल.....*..(हृदयीं फुलाला फुलली ..*...॥|
.....*.... २:१ ते २:६ मध्ये पान फाटलेले आहे

||.    . ||  (हा पद शिस पेन्सिल ने लिहिलं आहे, त्यामुळे काही सा अस्पष्ट असावा) )
छाया लागती दीर्घ या पाहुडती
झाल हि झाली ही सुरू आहे ती तरल हे जाती तरङ्गवली
ओलावा नुसता उरें पसरली काठावरी सावली ( होई लांबच लांब ती )
संधीतूनि हि दिव्य सूर्य किरणें ही ओसरु लागली
छाया भीषणच  दीर्घ ही पसरली चित्ती दिशा  दाटली
( कराया देवांची भजनें  पूजनें. घा...)
कराया देवांचीं भजने पूजनें
घालावीं भूषणें 'राम' म्हणे||
||३||

भाळीं 'बिजवरा' काना मध्यें रिंग|
माझा पांडुरंग शोभूं लागे ||१ ||

गळयामध्यें चेन त्याच्यांत लॉकेट |
कॉलरती नीट लोंबकळे (गळयामध्यें) || २||

अनामिके मध्यें अंगठी  छोटीशी|
चमके ती कशी तारके शी|| ३||

मणगटावर मनगट्यां घाला|
मोंत्यांच्या त्या माळा गळयामध्यें ||४||

कंबरपट्टा शोभे माणिकाचा|
चाळ तोरड्याच गोड नाद ||५||

.....वाले भूषणांचा साज  |
बाळकृष्ण आज माझा घाली||  ६||

||४||

....उजरी ऐसा डोळयाच्या समोर|
मनामध्ये मोर तरी नाचे ||१||

सगुण भक्ती ही मना पटु लागे| भाव होती जागे झोपलेले ||१||

बाळकृष्ण माझा दिसे रांगतांना| प्रेमें पाहतांना मन रंगे ||२||

रांगतां रांगतां मधे थांबे बाळ|
दृष्टि ती वेल्हाळ खिळूं लागे ||३||

डाव्या गुडघ्यावर डावा हात ठेवी |
उजवा हात टेकी भूमिवर ||४||

मोह मयी दृष्टी; कराया दर्शन |
आले भक्त जन धांवून ते ||५||

प्रेमाच्या लाटा त्या उसळूं लागती |
नयनीं लोटती अश्रू पूर ||६||

||६||

घराच्या गाभारा खरा हा देव्हारा |
नैवेद्य पसारा सारा जेथे||१||
आवरा पसारा बाळकृष्ण आला|
घालील तो घाला लोण्यावर ||२||

दूध दही लोणी माखायास लागे |
यशोदा ती रागें भरू लागे ||३||

काय करूं' ताई' मला सांगा 'नाना' |
खोड्या किती नाना करी बाळ ||४||
देव्हारा त्यांतील देव शत्रुपरी |
मानी बाळ , तरी काय करू ||५||

यशोदामाई ही 'प्रभा' सांगे नंदा|
बापाच्या आनंदा पार नाहीं ||६||

तारीख: २२.०४.१९३७

# सत्पात्री दान

आहे सागर दूर तो किति तरी!  हा दूर आहे तरु
कोठें ही जलबिंदु नाहिं जवळी आशा कुणाची धरू

पाण्यावाचुन वाळला तरु, तशीं पाने पुन्हां वाळली
तेजें तीव्र नभीं रवी तळपतां सारी तनू भाजली

तों वारा अनुकूल वाहत असे आशा मनीं जागली
येई श्यामल मेघ मस्तकिं कुणी टाकी वरी सावली

पाहुनी तरुच्या स्थितीस  द्रवला तेव्हां दयेचा निधी
प्रेमानें जलबिंदु दान करितां संपेच तापावधी

झालें हर्षित झाड ;  त्यास  फुटली आंता नवी पालवी
आतां हा नवकांतिने टवटवे काया हि झाली नवी

अर्पी प्रेम भरें कृतार्थ तरु तो मेघात पुष्पांजली
किंवा भावमयी कृतज्ञ  तरु तो अर्पीत पद्यावली

वाटे याचक  वृक्ष धन्य श्रमितां जो अर्पितो सावली
दानी मेघहि धन्य ! दान रुचिही सत्पात्रता पावली

# श्री जोशींचे लग्न

२७.१२.१९३७

हरी तरि तिथे लक्ष्मी तयाला
(शेषाच्या शयनी निजे  जळधिंची क..)

शेषाच्या शयनीं हरी; जलधि ची कन्या तिथे त्या वरी
घाली माळ शिवास अद्रितनया श्री पार्वती सुंदरी

प्रेमा मृदु गोड बंधनिं कुणी कोठे तरी भाळला
विद्वान् वा अवधूत वा विवश तो कार्या करी मंगला

तारीख ३०.१२.१९३८. ग्वाल्हेर

बाळ चिमुकला भाऊराया| घेउनि त्याला ये खेळाया
||ध्रुवपद||

जा, बाळा घेउनि ये पाहू

त्या चिमण्याची गंमत पाहू
खेळू खेळवुं गाणीं गाऊ
खाऊ देऊ त्याला खाया ||१||

मज नाहीं हो भाऊ-बहिण
आतां देवा मी अळवीन
बहीण तरि द्या मज धाडून
नाहीं मज कुणि घरिं खेळाया ||२||

कुठवर शेजारीं मी जाऊ
कुठें कुठें मी सोबति पाहू
कसा घरीं मी असाच राहू
जीव लागला कंटाळाया ||३||

किती मोठें घर हे तिघांला
देवा धाडा म्हणुनी बाळा
कृपा करा तुम्हि दीन दयाळा
सीमा कांही धीर धराया ||४||

अर्भक वाणी केविल वाणी
मुक्या जीवाची करूण  कहाणी
ऐकुनि,  उठला प्रभू खडबडूनी
लागे क्षीरोदधि खवळाया ||५||

प्रल्हादा प्रभु प्रसन्न झाला
दगडालाही पाझर फुटला
नारायण शिशु नवरुपें आला
बाळ लागला नाचाया ||६||

तारीख  ३१.०१.१९३९

काटें भोंवति फुल हें तरि डुले  सानंद नाचे हंसे
झंझावात उठे फुलास झटके नाना परी देतसे

शाखेच्च्या वर तें निसर्ग विभवा दैन्यांतही दाविते
सोडीना निजसत्व साधु परितें तत्त्वार्थ संपादितें
नानाकंटक संकटे भीमविती संसार बागेतली
कोणी कोकिल एकटा तरि म्हणें स्वर्गीय गीतावली

ऐसा एकमुखी निसर्ग कवि तू नाना पदें ऐकवी
माना डोलवितील ते तरि जगीं आहे खरे जे कवी

वेदान्ती ,कवि आणि पुष्परसवित्  भृंगापरी तूं रहा
कोणी कांहि म्हणो परन्तु अपल्या तत्त्वाकडे तूं पहा

ठेवूं हांव नको जगीं, कुणि म्हणों किंवा म्हणो ना बरें
स्वाध्यायांत सदा रहा निरत तूं,  चिंत्ती स्फुरो जें खरें

कोणी काय तुझें करील! सख्या तू हांस गा आपला
त्या हास्यांत विषण्णता तव विरो चैतन्य ( आनंद)  लाभो तुला

## अभंग

१

टाळया टाळ झांजा  वाजवा मृदंग| तरी अंतरंग नाद हीन ||

देवाच्या गळयांत सुमनाचे हार |तरीही अंतर गंधहीन||

संपलें भजन संपली आरती| अंतरीं न ज्योति तेवलीती  ||

पेढेही वाटले प्रसाद मिळाला| गोड ना मनाला तरी वाटे||

प्रसादी भक्तांचे  जमले हे मेळे |मुळीं ना आकळे भक्ति सुख ||

भक्ति सुखा रामा मन अंतरलें | संसार तरलें ज्यानें भक्त||

दुसरा अभंग आहे

समुद्रात गेलो स्नान करायाला| ओलावा मनाला मिळेनच ||

खारट खारट सारे अंग झाले |पाणी ना मिळाले मुळीं गोड||

कोठली ती मोत्यें शिंपल्यांत खोल | माझा मला तोल  संभाळे ना  ||

तुफान उठलें उसळती लाटा |दाही दिशा वाटा वाट नाहीं ||

माझ्या मिसळीचा [१] करावा निवाडा| कोणी तुम्ही धाडा न्यायाधीश ||

गुन्हे केव्हां कसे केलें कशापायीं |तेही तूझ्या पायीं अर्पियले ||

आम्हीं आहो तूझे खरें प्रजाजन| तन-मन धन तव पायीं||

भाकरी ना मिळे आम्ही रे उपाशी| कां न तुजपाशीं न्याय मागूं||

उपेक्षिसी आम्हा गरीब म्हणूनी |लेकरें जाणूनी न्याय द्यावा||

पोट आमचे हे जाण अपराधी| भंगे ती समाधी पोटापायीं ||

फुट नोट :- १ मिसळ (फारसी ) =फाइल , पिटीशन ,याचिका विचाराधीन प्रकरण असलेली

सूर्याचें सुटलें असें ग्रहण हें, गेली लया काळीमा|
चंद्राची स्थिति तीच होउनि तशी लागे हंसूं पूर्णिमा
ज्योतींच्या वरची झडून अथवा गेली असें काजळी
दोघांचीं वदनें अहा उजळलीं सर्वत्र भूमंडळीं ||१||

अंधारांतुनि मार्ग काढित पुन्हां सूर्यप्रभा फांकली
चंद्रज्योति हळूहळू रवि करें वाढावया लागली
काळे मेघट हि सर्व जाति विलया फांके शरच्चंद्रिका
दैवाची अति गाढ झोंप सरली गेली लया तंद्रिका ||२||

छाया तेज ,तसे निशा दिवस हे द्वंद्वात्मता दाविती
संसारीं दिसते अतर्क्य समता- वैषम्य भावस्थिती
आला हा रवि विश्वनाथ वरती अत्युन्नतिच्या पदीं
अर्पी पाहुनि रामचंद्र प्रणयें श्रद्धांजली तत्पदीं ||३||

तारीख २५.०५.१९४६
शुजालपुर

## चि.सौ. कां. वत्सला दामोदर दीक्षित ०५-०६-१९४६ निमित्त मंगलाष्टकें

श्री दामोदर दीक्षितात्म तनया नामें वधू वत्सला
पाहूनी जननी तरङ्गित मनीं झाली तिची वत्सला
वात्सल्यें मनिं भाउभावजयही मंदाकिनी आकुला
हर्षाश्रूसह वर्षती वरि शिरीं मुक्ताक्षता मंगला||१||

गङ्गा उज्वल जीवनें मिंसळते श्रीयामुनौघांतरीं
(ग्वाल्हेरींत) येथें होय त्रिवेणि संगम जणूं या दीक्षितांच्या घरीं
वेणी माधव पुत्र जीवन रसीं ही उज्वला वत्सला
पावो एकरसात्मता, उभयतां कार्या करो मंगला ||२||

बाळे आजवरी तुला जननिनें प्रेमांत जोपासले
दत्तें आणि दिगंबरें तुज मुळी सांभाळलें पाळले
बाळाजी वर हा विशारद असा एम.ए. तुला पाहिला
आतां तूं नवजीवनीं नवनव्या कार्यां करी मंगला ||३||

चि. वासुदेव दत्तात्रय दीक्षित याच्या व्रतबंधा प्रीत्यर्थ ०२.०६.१९४६
श्री दत्तात्रय वासुदेव बटू हा कौपीनधारी पहा
हातीं दंड कमंडलू चिमुकला शोभे किती बाळ हा
मुंजेची किति शोभते कटिंतटीं कीं कांचनी मेखला
श्री मंगलमूर्ती बाल बटू हा कार्या करो मंगला

## चि. लीला गजानन माणके व चि. दत्तात्रय गणेश उमडेकर यांच्या विवाह प्रसंगी मंगलाशीर्वाद  तारीख १२.०६.१९४६

लीला माणिक श्री गजाननसुता श्री शारदानंदिनी|
बोहोल्यावर ही उभी शुभ वधू सौभाग्य आकांक्षिणी||
दत्तात्रेयवरा गणेशतनया घालीत माळा गळां |
वर्षूं द्या वरुनी वधूवर शिरीं मुक्ताक्षता मंगला ||

||दोन ||

लीले सद्गुण मूर्ती मंगलमयी साक्षात् श्रीशारदा |
लक्ष्मी तू घरची, घरांत पसरली शांती , सुखें, संपदा||
बाळे आजवरी तुवां पितृगृहीं संसार सांभाळिला|
आतां तूं कर आपला, अस सुखी कार्या करी मंगल||

||तीन ||

बाल्याची सरली निशा उगवली लीला उद्याची उषा|
होती आजवरी गजानन सुता आता गणेश स्नुषा||
दोन्हीं एकच, सून आणि मुलगी सद्भाव हा बाणला|
या भावें उमडेकरां घरि अतां कार्या करा मंगला||

||चौथा||

भावांना जनकास आजवरि तूं सांभाळिले नंदिनी|
आता दीर नणंद सासू श्वसुरा आनंदयी गेहिनी||
लीले! सासार चे खरोखर, खरी मानोत लक्ष्मी तुला |
राही इंद्रपुरांत नंदनवनीं कार्या करी मंगला ||

||पाच ||

वेदें जो सजविला स्वयंभु भगवान् शास्त्रें तसा वर्णिला|
ज्यानें हा त्रिगुणात्मक बंधनिं सदा संसार आकर्षिला||
माया ब्रम्ह वधूवरात्म सगळ्या सृष्टींत जो रंगला|
दत्तात्रेय गणेश रूप गुणवान् लीला करी मंगला||

|| पाठवणी ||

येते ? ये बरं, बाळ आजवरि मी जे जाहले जाहळे |
जें तूं मांगितलें, दिलें स्वजनकें संभाळलें पाळले||
आतां जें उरलें हवें तुज तसे तेही तुला गे दिले|
राहीं गे नवजीवनां सुखें सानंद तूं मंगले||

## चि.सौ. कां. मालती शंकरराव जळगांवकर (रिटायर्ड डी.एस.पी. काळा पिपळ) व वसंत श्रीनाथ पाठक यांचा शुभविवाह तारीख ०७.०६.१९४६

श्रीनाथात्मज श्री वसंत वरहा आहे वधू मालती
जी श्रीशंकर -नंदिनी स्मितमुखी आई जिची पार्वती
या पाहून वधुवरास अनुगुणी आनंद कोंदाटला
हर्षाश्रू सह वर्षती वरि शिरीं मुक्ताक्षता मंगळा

उद्यानीं फुलली सुहास्य वदना उत्फुल्ल ही मालती
आला रम्य वसंत हास्यवादनें, कंठीं पडे माळ ती
गाई कोकि,ल मंगलाष्टका म्हणे ही मंजुळा कोकिळा
सृष्टीच्या शुभ मंडपीं वर वधू कार्या करो मंगला

पाठवणी

मालू ,आजवरी तुला जननीनें प्रेमात जोपासले
तुझे नेहमिं लाड ही पुरविले मागीतलें तें दिले
आतां जें उरलें वसंत वर ही बी.ए.तुला पाहिला
बाळे तूं नवजीवनीं वस सुखें
मांगल्यें नवजीवनीं विहर तू कार्या करी मंगला

( स्वाक्षरीत नसलेली ही दोन पाने,१०७-१०८)

Note :-२०.०३.१९४४ माणिक ताई यांच्या जन्माला ती. नाना वैद्य यांनी केलेली व प्रभावती वैद्य यांनी स्वतः सदर वहीत लिहून ठेवली आहे

नवमी फाल्गुन वद्य दिनी या संवत् दोन हजार |
वीस दिनांकीं मार्च पहाटे, वाजती सव्वा चार ||
चंद्रकला हि प्रभा प्रसवली चंद्राची ज्योती |
चंद्रकोर ही अथवा प्रगटे दिव्य प्रभेची मूर्ति ||
प्रभावतीची कूस उजवली चंद्रकोर उगवे |
चंद्रवारिं या चंद्रकळेचें प्रगटें तेज नवें||
वसंत ऋतुच्या प्रथम दिनांकीं मंगल पूर्ण घडी |
वैद्यांच्या घरिं वद्य नवमीला उभारलीच गुढी||
नंदिनीचें अभिनंदन जय, जय कवि जयवंत वसंत|
विकसति सलील कुसुमांतरि मग सुंदर भावअनंत||
नव्या जीवनें नवीन मधुरहि आशांकुर उपजे|
प्रथम कळी मग पुष्पगुच्छ ही स्वभावतः निपजे ||
गुढी लागली आज तुझ्या घरिं तोरण मग लागो |
गुढ्या तोरणें नंदनवन वत तव गजबजुनी लागो||
दोघी चंपा आजी घेती मांडी वरती बाळा |
गळयांत शिशुच्या हर्षाश्रूंची घालती त्या माळां||

हर्ष उसळला, विकास झाला मंगलमय भावा|
सृष्टी क्रमानें बहीण आणिल  मागून अपल्या भावा||

Note:- refers to 20.03.1944 early morning at 04:15 on navami phalguna Monday. Author seems to be Shriyut J D Vaidya

||**श्री** ||

**इंद्रपूर ( इन्दौर) निवासी श्रीमान् भँवरलालजी सेठी की सुपौत्री और श्रीमान् राजेंद्र कुमार जी सेठी की सुपुत्री श्रीमती सौभाग्य कांक्षिणी गिरिबाला सेठी और कलकत्ता निवासी श्रीमान् जीवनचंद्रजी गंगवाल के पाणिग्रहण के उपलक्ष्य मे मंगल चिंतन तारीख 16 फेब्रुवारी 1957**

आयान्त्वद्य तपोधना जिनपदास्तीर्थङ्करा मण्डपे।
आयान्त्वद्य सुराः कलत्र सहिताः हा प्रोद्भासयन्तोदिशः ||
आयान्त्वद्य कुटुम्बिनः सुरभिभिहारैः सुमनांयुताः |
सौरभ्यंशुभ मंडपे वितनुतां हृन्मण्डपे मङ्गलम् ||१||

इंद्रपुरी का नंदनवन यह भ्रमर नाद से गुञ्जित है|
अनूप -प्रभा-मय माणिक -मंदिर , मणिरञ्जित छबिपुञ्जित है ||
विविध -पताका मण्डित- मण्डप, वंदनवार बँधे भावें|
गगनतारका दीप मालिका जगमग जगमग चमकावें||

मंगल स्वागत गीत मनोहर वाद्यनाद से गगनभरा|
नंदनवन यह नरनारी के हर्ष भाव से हराभरा||
देखी अद्भुत बात यहाँ पर आज हुई जो एक नई|
कलकत्ता के जीवन -निधि की बारात प्रमुदित प्राप्त हुई||

गिरीराजेंद्र -सुभद्राञ्चल से गिरीबाला गङ्गा उछली |
छोटीसी यह जीवन-धारा बढ़कर बढ़ती हुई चली ||
गिरीबाला की जीवनसरिता में नव -जीवन -स्रोत मिले|
देख दृश्य यह कमलादेवी शांतिदेवी के वदन खिले ||

नलिन ,प्रदीप ,नरेश, सुरेखा ,मधूलिका,ज्योत्स्ना, मृदुला |

लेखा(चंद्रलेखा ) ,अरुणा -जीवन -नवरस -मिश्रित -भाव-प्रवाह चला ||
निर्मल गङ्गा जीवन में शुभ जीवन- चंद्र विकास हुआ|
गिरिबाला का हृदय तरङ्गित प्रमुदित विकसित चित्त हुआ||

तरङ्गिणी ले तरङ्गकर में सुरभि सुमन की मधुमाला|
जीवननिधी के कण्ठ समर्पण करती है यह गिरिबाला ||
देख कुँवर को भँवरलालजी, धन्य अनूपप्रभा माता|
धन्य हुए कैलाशचंद्रजी ,वीरेन्द्र सहोदरभ्राता||

गिरिबाला सम पत्नी पाकर जीवनचंद्र सुधन्य हुए |
धन्य हुए राजेंद्रसुभद्रा दोनों कुल अतिधन्य हुए ||
जिनेन्द्र भगवान् नवदंपतिका -जीवन सुखमय सदा करें|
फूले दिन दिन हृन्नन्दनवन नवसौरभ नवरङ्ग भरें||

प्रेम परस्पर मंगलमय हो बढै प्रेम की शुभ नित धारा|
प्रेम ज्योतिमय गृह हो,कुल हो, उज्ज्वल संसार तुम्हारा ||

मंजुल मंगल स्वर संगम में जीवन -गीत मनोहर हो|
दीर्घायू सुखसमृद्ध हो नित सुखदुख में तुम एक रहो||

पाणि ग्रहण का समय:-
शुभमिती फाल्गुन कृष्ण २ शनिवार संवत २०१३
तदनुसार तारीख १६ फरवरी सन १९५७
रात्रि के ३|| बजे. (Groom's father's name: लाडणु निवासी श्रीमान राय बहादुर साहजी श्री तोलाराम साहब गंगवाल )

शुभचिंतक रामचंद्र वामन पंतोजी
माणिक भवन, तुकोगंज, इंदौर .

||श्री ||

**इंद्रपूर (इन्दौर )निवासी श्रीमान् भँवरलालजी सेठी के सुपौत्र और श्रीमान् कैलाशचंद्रजी सेठी के सुपुत्र चि.नलिन चंद्र सेठी और इन्दौर निवासी रावराजा, राज्य रत्न, जैनदिवाकर सर सेठ श्री हुकुमचन्दजी की सुपौत्री और रायबहादुर श्री राजकुमार सिंह जी की सुपुत्री सौभाग्य कांक्षिणी चि. विद्युल्लताबाई के पाणिग्रहण के उपलक्ष मे मंगल चिंतन**

आयान्त्वद्य तपोधना मुनिवरास्तीर्थंकरा मंडपे |
आयान्त्वद्य सुराः कलत्रसहितः प्रोद्भासयन्तो दिशः ||
आयान्त्वद्य कुटुम्बिनः सुरभिभिर्हारैः सुमानां युताः |
सौरभ्यं शुभमण्डपे वितनुतां हृन्मण्डपे मंगलम् ||

इंद्रपुरी का नंदनवन यह भ्रमर नाद से गुञ्जित है|
अनूपप्रभा- मय माणिक- मंदिर मणिरञ्जित छबिपुञ्जित है||
विविध- पताका -मंडित मंडप, वंदनवार बँधे,भावें|
गगनतारका दीप -मालिका जगमग जगमग चमकावें||

मंगल स्वागतगीत मनोहर, वाद्यनाद से गगन भरा|
नंदनवन यह नर नारी के हर्ष भाव से हरा भरा||
राजकुमारी विद्युत् बाला श्री हुकुमचंद्र की पौत्री|
इंद्रभुवन के नंदनवन में प्रगट हुई शुभ गात्री ||

Refer print copy to proofread

विद्युत् तेजोमय किरणों की लेकर करमें जयमाला
|नीलमेघ सम नलिन कंठ में अर्पण करती है बाला||
इंद्रभुवन वह माणिकगृह यह मध्यमार्ग व्यवधान हटा |
दो घर, दो मन एक हुए फिर, द्वैत भाव संपूर्ण मिटा||

अनूपप्रभासह भँवरलालजी विद्युत् सुवधु के मुख को|
देख, हुए अति प्रसन्न मन में प्राप्त हुए (अतुलित) अनुपम सुख को ||
विद्युत् साक्षात् गृहलक्ष्मी तुम मंगल करणी देवी हो |
माणिकभवन हृदय से कहता। ' स्वागत, स्वागत, स्वागत हो' ||

प्रदीप, नरेश तुम्हारे देवर ज्योत्स्ना, मृदुला, गिरिबाला|
लेखा, रेखा, मधूलिका है अरुणा ननंदों की माला||
श्वश्रू (सासें) कमला, शान्ति, सुभद्रा सारे स्वागत करते हैं|
कैलाश श्वशुर,राजेन्द्र तथा वीरेन्द्र 'शुभागम' कहते हैं ||

नलिन तुम्हारे हृदय- गगन में विद्युज्ज्योती- विलास रहे|
सहित सहचरी मंगल जीवन- स्रोत सदा दिनरात बहे||
जिनेन्द्र भगवान् नवदंपति का जीवन सुखमय सदा करें|
फूले दिन दिन हृन्नन्दनवन नवसौरभ नवरङ्ग भरे ||

पृष्ठ क्रमांक११४

Refer print copy to proofread

प्रेम परस्पर मंगलमय हो बढै प्रेम की शुभ धारा|
प्रेम ज्योतिमय गृह हो, कुल हो, उज्वल संसार तुम्हारा ||
मंजुल, मंगल स्वरसंगम में जीवनगीत मनोहर हो |
दीर्घायु सुखी, समृद्ध हो नित, सुखदुख में तुम एक रहो||

शुभचिंतक
रामचंद्र वामन पंतजी
माणिक भवन, तुकोगंज इन्दौर.

पाणि ग्रहण का समय
शुभमिती फाल्गुन शुक्लपक्ष २ गुरुवार संवत् २०१४
तदनुसार तारीख २० फरवरी १९५८ रात्रि के ५|| बजे

पृष्ठ क्रमांक ११५
१५.०५.१९५८ निमित्त

**चि. बाबा (यशवंत रामचंद्र पंतोजी M.Sc.) आणि चि.सौ.कां. सुलभा धुंडिराज सप्रे B.A.(Junior) यांच्या मंगल विवाह प्रीत्यर्थ शुभाशीर्वादात्मक मंगलाष्टकें**

आयांन्त्वत्रहि काश्यपात्रि मुनयः स्वाशीर्मुख मंडपे|
आयांत्वद्य सुराः कलत्र सहिताः प्रोद्भासयन्तो दिशः||
आयांत्वत्र कुटुंबीनः सुरभिभिर्हारैः सुमानां युताः |
सौरभ्यं शुभमंडपे वितनुतां हृन्मंडपे मङ्गलम् ||१||

डोळे दोनच दृष्टि एक असते दृश्यैक्य ते पाहती|
पायांची गति एक, कर्ण युगलें शब्दैक्य तीं ऐकतीं||
विभिन्नते न द्वंद्वातील विभिन्नतेत वसते एकात्मता मंगला|
मायाब्रह्म वधु वर प्रणय हा कार्या करो मंगला|| २||

भाळीं श्री कमळा भरी मळवटा, माणिक मुक्ताक्षता|
जोडा कुंकुम| काढि पाय धुवुनी मंदाकिनी ही स्वतां ||
गुंफी इंदु,प्रभा सुतारकगणां बांधीति मुंडावळया|
शोभे श्री जयवंत बंधु वर हा कार्या करो मंगळा. ||३||

सप्रे नामक धुंडीराज-कमला यांची वधू नंदिनी |
शोभेची भगिनी, सहोदर शरद्, सौभाग्य आकांक्षिणी||
सीताराम सुता वरास वरित्ये घालुन माळा गळां
दोघे ही यशवंत आणि सुलभा कार्यां करा मंगळा ||४||

सास्वा तीन श्वशूर् मावशि तशी भाच्या नणंदा स्वतां|
भाचे दीर संपत्निमातुल उभे आत्या वधू- स्वागता||
विद्यारूप गुणाणुरूप बघुनी जोडा असा शोभला |
हर्षाश्रू सह सर्व वर्षति शिरीं मुक्ताक्षता मंगला ||५||

चि. श्री यशवंत यास उद्देशून :-
बाळा होशिल आज पासूनि पुढें आतां गृहस्थाश्रमी |
लाभो ही सुलभा सुशील गृहिणी संसार मार्गा क्रमीं||
त्याग -प्रेम परस्परांत विकसो सद्भाव चित्तांतला|
प्रेमानें जगतांत प्रेम मिळतें कार्या करी मंगला ||६||

चि. सौ. कां. सुलभेस उद्देशून :-
होती तूं कुलकन्यका पण अतां झाली गृहस्वामिनी|
बाबा हा यशवन्त तू यशवती होईल जगद्वन्दिनी ||
लक्ष्मी तूं, गुणमंडिता, सतत दे आनन्द दोन्हीं कुलां|
सीताराम कृपें सुमंगलमयी कार्या करी मंगला ||७||

बाळे आजवरी तुला जननिनें प्रेमांत जोपासलें |
आजीनें जनकें मनोरथ तुझे संपूर्ण संपादिले||
आतां हा यशवन्त योग्य पती ही धुंडून त्यांनीं दिला||
सासू प्रेममयी तुझी जननिशी कार्या करी मंगला ||८||

उभयतांचा शुभचिन्तक
रामचंद्र वामन पंतोजी
माणिक भवन , तुकोगंज, इंदूर.

**चि. रामभाऊ कृष्णराव माणके यांच्या विवाह प्रीत्यर्थ**
**विवाह दिनांक ०३.०६.१९५८ मुक्काम हरदा**

भामा कृष्ण सुपुत्र रामवर हा ,उत्फुल्ल चित्ता नवरीं
आहे राम मनोरमासुतनया ,शोभे वधू सुंदरी
उत्फुल्लें हृदयें वरास वरित्ये घालूनि माळा गळां
दोघेही तुम्हिं रामचंद्र विजया कार्या करा मंगला ||१||

**चि. श्री रामभाऊस उद्देशून**
बाळा होशिल आजपासुनि पुढें आतां गृहस्थाश्रमीं
लाभे ही विजया सुशील गृहिणी संसार मार्गा क्रमीं
त्याग प्रेम परस्परांत विकसो सद्भाव चित्तांतला
प्रेमाने जगतांत प्रेम मिळते कार्या करी मंगला ||२||

**चि. सौ. कां विजयास उद्देशून**
होती तू कुलकन्यका पण आतां झाली गृहस्वामिनी
सीता तुल्य यशस्विनी सुचरिता होई जगद्वंदिनी
लक्ष्मी तूं गुण मंडिता सतत दे आनंद दोन्हीं कुलां
सीताराम कृपें सुमंगलमयी कार्या करी मंगला ||३||
बाळे आजवरी तुला जननिनें प्रेमात जोपासली
आजीनें जनकें मनोरथ तुझे संपूर्ण संपादिले
आतां 'राम' सुयोग्य सूज्ञ पति ही धुंडून त्यांनीं दिला
सासू प्रेम मयी तुझी जननिशी कार्या करी मंगला ||४||

दिनांक१५.०५.१९५८   विवाह तिथि वैशाख कृष्ण  १२ गुरुवार , गोरज ,संवत २०१५

## विहीण

(चि. सौ. कां. सुलभाच्या विवाह प्रीत्यर्थ तारीख: १५.०५.१९५८ वैशाख कृष्ण १२ संवत २०१५
(चाल: निंबलोण उतरतां,अशी कां झालीस गऽ बावरी)

मुली तू आलिस अपल्या घरीं,
हळदीचें तव पाउल पडतां,
घरची लक्ष्मी हरषुन आतां,
सोन्याहुन गऽ झाली पिंवळी ,
मांडवाला कवळून चढली,
चैत्र वेल ही वरी ,मुली
विहिणी, आजी, मावशि, आत्या, गहिंवरली अंतरीं
येत असे सुलभा अपल्या घरीं (ध्रुवपद )

सुलभा माझी मंगल करणी
चंद्राची ही जणूं चांदणी
माझ्या राजाची ही राणी
यशवन्ताची यशवन्ती ही ,
बरोबर ये सासरीं
(येई बरोबर घरीं )
येत असे  सुलभा अपल्या घरीं ॥१॥

नदी कुठें तरि उगम पावते
वाहत सासरिं सागरिं  जाते
दोन जिवाची मिळवणि  होते
संसारांतिल रीत अशी ही, खेद कशाला तरी
येत असे सुलभा अपल्या घरीं ॥२॥

नको काळजी तुम्हां मुळी ही
असते कीं हो मला मुली ही
मुली सारखी राहिल ही ही
होइ ममनन्दनवन वेली, खरंच ,खरोखर,खरी
येत असे सुलभा पल्या घरीं ||३||

सीमा ज्यांच्या नच आनंदा
धावत आल्या शैला माणिक मंदा
भंवती हंसती कमलादि नणंदा
हसऱ्या कळया पाकळया
कमलासनिं ही हंसरी, मध्ये शोभलि लक्ष्मी परी

येत असे सुलभा अपल्या घरीं ||४|

आज वरी ही तुमची होती
आतां दिव्याची माझ्या ज्योती
सरसाविन मी स्नेहें हातीं (वाती )
प्रेमें अपलें रामराज्य मी, अर्पिन सुलभा-करीं
येत असे सुलभा अपल्या घरीं ||५||

||**श्री** ||

**सौ. कां. मंदाकिनी रामचंद्र पंतोजी आणि चि. श्री सीताराम शंकर देशपांडे B.Com. यांच्या मंगल विवाह प्रीत्यर्थ शुभ आशीर्वादात्मक मंगलाष्टकें**

डोळे दोनच दृष्टी एक असते दृश्यैक्य ते पाहती |
पायाची गति एक, कर्णयुगलें शब्दैक्य तीं ऐकती||
द्वंद्वांतील विभिन्नतेंत वसते एकात्मता मंगल|
माया -ब्रह्म -वधूवर- प्रणय हा कार्या करो मंगला ||१||

भाळीं श्री कमळा भरी मळवटा, माणिक मुक्ताक्षता
जोडा कुंकुम काढिती प्रतिपदीं, इंदू प्रभा या स्वतां||
शैला गुंफितसे फुलांस, सुलभा बांधीत मुंडावळया|
सौभाग्यें नटली वधू शुभमुखी मंदाकिनी मंगला ||२||

ज्याचे शंकर तात माय कमळा श्रीदेवकीच्या परी|
जी आणीं बळवंत गोकुळिं घरीं अर्पी यशोदा करीं||
वासन्ती, नलिनी सबंधु भगिनी ज्याच्या सवें खेळल्या|
सीताराम वरास त्या वरितसे मंदा वधू मंगला ||३||

माझा कुंजवनांत नंदनवनीं मंदाकिनी जन्मली|
प्रेमाच्या मधुमंडपीं विकसली प्रेमांत ती वाढली ||
सासू प्रेममयी, श्वशूर पति ही प्रेमीं मिळाले तिला|
सीताराम कृपा पुढें मिळवुनीं कार्या करो मंगला||४||

**चि.श्री सीताराम यांस उद्देशून :-**

सीताराम तुम्हांस अर्पिलि असे, मंदाकिनी पावनीं|
सीताराम सुता सुमंगलमयी आनंदिनी गेहिनी ||
जी च्या प्रेरक जीवनें मिळवुनी कीर्ती भविष्योज्वला|
संसारांत सुखी रहा प्रतिदिनी कार्या करा मंगला ||५||

**चिरंजीव सौ. कां. मंदाकिनीस उद्देशून:-**

तातें बाळ तुला तुझ्या जननिनें प्रेमांत जोपासलें|
खोले विठ्ठल, मात तुल्य कमळा यांना हि सांभाळिलें||
खोले बंधु,जया सहोदर तुझा, बाबादि प्रेमें तुला|
सारे मंगल चिंतिती , पति सवें कार्या करी मंगला ||६||
होती तूं कुलकन्याका पण अतां झालीं गृहस्वामिनी|
सिताराम पती सवें सफल हो तूं आपल्या जीवनी||
सार्‍याचे मिळवून प्रेम सुखवी सर्वांस, दोन्हीं कुलां|
सीताराम कृपें सुहास्य- वदना कार्या करीं मंगला ||७||

**दोन्हीं वधू-वरास उद्देशून:-**

झाला धन्य अतां तुम्हीं उभयतां, झाला गृहस्थाश्रमी|
संसारांत परस्परांस सुखवा, सर्व प्रकारें तुम्हीं||
त्याग -प्रेम परस्परांत विकसो सद्भाव चित्तांतला |
प्रेमें प्रेम मिळे सदैव समजा कार्या करी मंगला ||८|

विवाह मुहूर्त :-
आषाढ शुक्लपक्ष सप्तमी
संवत २०१६
१२.०७.१९५९ ,
रविवारी सकाळी ०९.१८, माणिक भवन इंदूर

**उभय वधूवरांचा शुभचिंतक**
**रामचंद्र वामन पंतोजी**
**माणिक भवन इंदूर**

पृष्ठ क्रमांक १२०
विवाह तिथी
ज्येष्ठ कृष्ण* पक्ष ८ संवत् २०२०,शके१८८५
दिनांक १५.०६.१९६३ शनिवार
वेळ सायंकाळी ५:१२ मिनिटें

**चि.विजयकुमार विठ्ठल खोले व चि. सौ. कां. कलावती गणेश दंडवते यांच्या मंगल विवाह प्रसंगी लिहिलेलीं शुभाशीर्वादात्मक मंगळाष्टकें,**

नामें दंडवतें वधू गणपती श्री शारदा-नंदिनी |
घाली मंगल भूषणें स्मितमुखी सौभाग्य आकांक्षिणी||
पाही प्रेमभरें वरा, विजयच्या घालीत माला गळा |
ठेवा दंपतिला सुखी प्रभुवरा कार्या करा मंगला ||१||

माता श्रीकमला व मोहन तसे बंधू सुधीर -अनिल |
पाहुनी विजया वरा जनकही आनंदला विठ्ठल ||
आजी मातुल मावशी वरवधू पाहून आनंदल्या|
हर्षाश्रू सह सर्व वर्षति शिरीं मुक्ताक्षता मंगला ||२||

दोनाचे कर चार आज दिसती झाले अहा एकदां |
दोन्हींही हृदयांतली मिसळली एकत्र हृत्संपदा||
दोन्हीं दृष्टिंत दृश्य एक, प्रगटे सद्भाव दोघांतला|
भिन्नत्वांतिल रम्य एक रसता कार्या करो मंगला ||३||

**चिरंजीव सौ. कां. कलावतीस उद्देशून :-**

बाळे तूं कुलकन्यका पण अतां झाली गृहस्वामिनी|
सासू प्रेमळ,दीरही, श्वशुरही, तू खेळ प्रेमाङ्गणी ||
गीतें मंजुल गा वसंत समयीं, गाईजशी कोकिला|
खोल्यांच्या मधून मंजू गुंजन रवें खोल्या भरी मंगला||४||

(जाई सर्व निशा विषादिलया झाल्या दिशा प्राची दिशा
भालेकुमकुमी प्रकटली आरक्त वर्ण उषा
घाली मस्तकी तारकांचीत अशा मंडावळया शोभल्या
मागून वर रवीबिंब ये वर हळू कार्य करे मंगला ).
**Note: सायंकाळच्या मुहूर्तावर शोभत नसल्याने ह्या ओळी गाळल्या असाव्या.**

.

**चिरंजीव विजयकुमारास उद्देशून:-**
झाला आज विवाह बाळ विजया, होशी गृहस्थाश्रमी|
लाभें,श्रीमति ही कलावति वधू, भार्या सुशीला गुणी||
प्रेमानें मिळुनी करा उभयता संसार हा आपला|
सीताराम कृपें पुढें प्रतिदिनि कार्या करा मंगला||५||

उभय वधू वरांचा शुभचिंतक
रामचंद्र वामन पंतोजी

तारीख १५.०६.१९६३

**Note: छापील cyclostyled copy मधील तारीख चुकीची आहे ज्येष्ठ शुक्लपक्ष ८ नसून ती ज्येष्ठ कृष्ण पक्ष ८ आहे! मूल हस्तलिखित मध्ये ही बरोबर आहे!**

# चि. प्रभाकर जयवंत वैद्य यांच्या व्रतबंध  प्रसंगीं लिहिलेली मंगलाष्टके

आयान्त्वद्य शुभा मुहूर्त घटिका दांपत्य भावाश्रयाः|
आयान्त्वद्य सुराःकलत्र सहिताः हा प्रोद्भासयन्तोदिशः ||
आयान्त्वद्य कुटुम्बिनः सुरभिभिहारैः सुमनांयुताः |
सौरभ्यंशुभ मंडपे वितनुतां हृन्मण्डपे मङ्गलम् ||१||

घालून मृगचर्मयुक्त विमला यज्ञोगपवीतास हा
हातीं दण्ड कमण्डलू चिमुकला कौपीन धारी पहा
मुंजेची किति शोभते कटितटीं कीं कांचनी मेखला
श्रीमन्मङ्गलमूर्ति बाळ बटू हा कार्या करो मङ्गला ||२||

मुन्नी माणिक मंगला भगिनिया बाला सुरेखा तशी
आजी दोन्हिंहि चंपुताई  कमला इंदु तशी मावशी
मामा हा जयवंत तातहि तसे, आई प्रभा प्रेमला
आत्या वर्षतित्या प्रभाकर शिरीं  मुक्ताक्षता मङ्गला||३||

चारी या भगिनी प्रभाकर बटू ताराङ्गणी चंद्रमा
या वैद्यां गणि ते जणूं विहारती सोडून सृष्टिक्रमा
किंवा या कमळास भोंवति जणूं चारी कळया पाकळया
त्यांचा दिव्य विकास हा प्रतिदिनी कार्या करो मंगला ||४||

झाला हा व्रत बंध, घे व्रत नवे, शिक्षा नवी आवडो
बाळा पाळ स्वधर्म कर्म अपलें कल्याण ज्यानें घडो
वैद्यांच्या कुलदीपका उजळवी तूं भू नभो मंडळा
आनंदे कर तू प्रभाकर बटो, कार्या नव्या मङ्गला||५||

व्यायामें दृढ तूं करी स्वतनुला या ब्रह्मचर्याश्रमीं
विद्योपार्जनिं ठेव नित्य रुचि हे ! विद्वान,गुणी, संयमी
तूझ्या निर्मल मानसीं प्रगट हो सद्भावना मङ्गला
वाढो कीर्ति तुझी प्रभाकर बटू कार्या करी मङ्गला||६||
तारीख २८.०४.१९६३

हितचिंतक
रामचंद्र वामन पंतोजी
इंदूर

पृष्ठ क्रमांक १२९

Last page written in reverse order ,notebook inverted down to top

. . ... फिर ...

... जी करके तडप लू दर्द उठ . ... ता

फिर मस्त निगाहो मुझसे गिला ओ शोक दर्द

फिर मुझको बना दे दिवाना बरबाद सुकूने दिल कर दे मरकद पे खडे व कहते है ये कैसा सदा है अति है

इन खाके खाके जरा को या रब झूम कर जो मेरा तडपता दिल कर दे

हे दस्ते जणू चल हद से गुजर जीनो की तमन्ना पुरी कर

लैला को खींच ले दामन से टुकडे टुकडे हा मिलकर दे

तू फेक नगर शर ,भेद हृदय मम नेत्र भिड

दे अति तडफडूं व्यथित मनें

पृष्ठ क्रमांक १२८
रिवर्स ऑर्डर

कौन स्वतंत्र रहे जग मे जब बंधन चारो और दिखता

कौन स्वतंत्र रहे जग में जब बंधन चारों ओर दिखाता
घर में बंधन बाहर बंधन बंधन में मन गोते खाता
यह मत सोचो, वह मत बोलो बंधन के यम पाश पड़े हैं काल पुरुष के मुख में हम सब मेंढक से जा जकड़े हैं||१||

जबां कलम की बंधन में है बंध में हम घड़ी प्रहर हैं
कपट निबंधन में है रहते, जीवन दुख कर हर हर है
कपट माया प्रेरित गहिरा कुत्रा फैलाते हैं नित्य छली
फंसी जाल में मछुओं के यों बड़ी तड़पती मछली ||२||

भोले भाले जग में जन जो भ्रमवश बंधन में हैं रहते |
कहते स्वतंत्र हैं हम वह पर बंधन में दुख को सहते ||
फूल सरी से कोमल बंधन में मन भौंरा रहता |
बंधन का यदि रूप बताएं सुख में लिपटा नहिं सुनता ||३||

बहुत हुए अवतार हिंद में पर एक नहीं मोहन का सा

भक्ति भाव के बंधन में रह था प्रेम सत्य का प्यासा स्वतंत्रता की उत्पत्ति पर बंधन में सच है होती
स्वतंत्र मोहन जन्मे जब मन बंधन में थी रोटी.....

तूने तो मुझे जालिम दीवाना बना डाला
अपने रुखे रोशन का परवाना बना डाला
मस्जिद में वो अजाने कौसर का बयां छेड़ा
रिंदों ने वहीं अपना मैखाना बना डाला
जाहिद को हुआ पैदा पीने का नया चस्का
कूजा जो वजू का था पैमाना बना डाला

तस्वीरे सनम रख दी मेंबर के , करीं
हमने नशे में भी छोटा सा भूत खाना
काबे में भी छोटा सा बुत खाना बना डाला
निकले हैं जब वादा अरमान ने दिली सारे
लो हमने भरे घर को वीराना बना डाला

...खेळूया हाडे हो प्रेमे नाचूया सारे ग म रे सागरे सारे येती वेळे वायु संगे नटूनी नाचाया कटिपरी
.... जाई जुई मालतीला
.... चमेलीला बहर आला
वसंत घेऊनी मदन बाणा आला नाचाया ||टिपरी ||

संकट में हंसना सिखला प्रभू चलना सिखला कंटक में
किरणों का तू मार्ग बता बन दीप तमोमय झंझट में
आहट मैं सुन ध्वनि के धुन मे एक तान का सुख पाऊं
अनन्तधुन में एक गीत की धुन,गति लय मन में लाऊं

कर सुदर्शन लेकर दर्शन | त्वरित दे कर हा अरि मर्दन

सत्व शुद्धी का सत्याग्रह का अवलंबन था करता
अरि दल बल में निडर बोलता डर भी जिससे डरता
योगी भोगी सब कुछ वह था राजकाज में निपुण तथा
युक्ति योजना समयोचित कर खल बलनाशक वह था ||५||

मोहन के व्यवहार तत्त्व को समझे जो नर भारत का
मानो बंधन मुक्त हुआ वह आश्रय करके शुभ पथका
स्वार्थ परार्थ हुए  जिसके सम भारत प्यारा अपना है
जो समझे यह स्वतंत्र वह है और शेष सब सपना है||

पृष्ठ क्रमांक १२५
रिवर्स ऑर्डर मे

शौनक सुतके प्रति |
करते है यह विनंती |
काही एकलीयुग स्थिती |
महाराज ||१||
वक्ता आपके समान|
कौन है अन्य विद्यमान|
जोही बतावे हमें ज्ञान|
भविष्य का ||२||

सूत के मन मे समाधान |
होते ही कहा आख्यान|
कलियुग का महिमान संक्षेप में|
आपका प्रश्न है उत्तम |.....

पृष्ठ क्रमांक १२३
रिव्हर्स ऑर्डरमध्ये

झूला झूलो झूलो, झूलो मेरे लाल|
इसी मे झूले थे बाल मोतीलाल ||ध्रुवपद ||

झूले में झूले थे छोटे बडे भाई
झूले मे झूले थे महादेव देसाई
झूले में झूली थी कस्तुरीबा माई
लोहे के गजों मे झूले मेरे लाल ||१||

झूले में हमारे गणेश हैं नेता
झूला है झुलाती भारत माता
प्रेम का है झूला, प्रेम का है नाता
प्रेम की डोरी से लेती मां सम्हाल

मोहन मूरत कीर्ति सब गाते
झूले में बैठे हैं जग को झुलाते
प्रेम की ज्योति को मन में जगाते
हिंडोले में डोलो डोली डोलो लाल

समाप्त

मंगलाष्टकं

**चि सौ कां. डॉ मंगला जयवन्त वैद्य आणि चि  डॉ दिलीप अवधूत जोशी यांच्या शुभविवाह निमित्त लिहिलेली**

२४.११. १९६९     मंगलाष्टके

जीचे श्री जयवंत तात, जननी स्वर्गीय देवी प्रभा
मृणाल ,माणिक या सुरेख भगिनी , बंधू जिचा हा प्रभा
मामा, मावशि आप्त मंडळि मधें शोभे वधू मंगला
हर्षाश्रूसह सर्व वर्षति शिरीं मुक्ताक्षता मंगला ॥ १ ॥

ज्याचे श्री अवधूत तात, जननी श्री नर्मदा पावनी
जीजी ज्याचि  शशांक, शंतनु शरच्चंद्रा सवे येउनी
भाऊ भावजयीस पाहि विजया प्रेमें दिलीपाग्रजा
हर्षे वर्षति ते वधू वर शिरीं मुक्तक्षता मंगला  ॥ २ ॥

दोनाचे कर चार आज दिसती, झाले अहा एकदां
झाली चार करांत दोन हृदयीं एकत्र हृत्संपदा
दोन्हीं दृष्टित दृष्य एक प्रगटे सद्भाव दोघांतला
भिन्नत्वांतिल रम्य , एक रसता कार्या करो मंगला ॥ ३ ॥

चि. कु. मंगले स उद्देशून :-

बाळे , आजवरी तुला जननिनें , तातें तसें पाळिलें
प्रेमें लाडे तुझे सदा पुरविलें , मागीतलें तें दिलें

आतां जें उरलें हवें तुज तसे तेही तुला गे दिले
दाम्पत्य - प्रणयांत मंगल नव्या कार्या करी मंगले ॥ ४ ॥

सासूची असुंदे तुझ्यावर मुली माया तशी सावली
होवो मंगल ती सुमंगलमयी आई परी माउली
वाटे तूं श्वशुरा दिलीप पतिला लक्ष्मी महन्मंगला
प्रेमें वाग, मिळेल प्रेम जगतीं कार्या करी मंगला ॥ ५ ॥

दोघांना उद्देशून :-
झाला आज दिलीप - मंगल तुम्ही दोघे गृहस्थाश्रमी
संसारांत समृद्धि , कीर्ति मिळवा दीर्घायु व्हा संयमी
त्याग - प्रेम परस्परांत असूं द्या , ही जीवनाची कला
दोघे डॉक्टर - डॉक्टरीण मिळुनी कार्या करा मंगला ॥ ६ ॥

दिनांक २४ .११. १९६९
तिथी कार्तिक वद्य प्रतिपदा

उभय वधू -वरांचा शुभाचिंतक

रामचंद्र वामन पंतोजी

चि अनंत दिनकर माणके  आणि सौ कां सुधा नारायण प्रचण्ड

२७. ०६. १९६५

॥ श्री लक्ष्मी नृसिंह प्रसन्न ॥

चि. श्री अनन्त  दिनकर माणके B.Sc. L .L .B  व चि.सौ. कां. सुधा नारायण प्रचण्ड B. A . यांच्या विवाहा निमित

शुभाशीर्वादात्मक मंगलाष्टकें

श्रीनारायण नन्दिनीस प्रमिला माता तिची प्रेमला।
माङ्गल्ये शुभभूषणें सजवितां आनंद वाटे तिला ॥
शोभे दिव्य - उषा - रवीन्द्र भगिनी नामें वधू ही सुधा।
आनंदाश्रु प्रचण्ड वर्षतिशिरी मुक्ताक्षता मंगला ॥ १ ॥

आई प्रेममयी सुशील सुशिला केलें जिनें पालन।
भाऊ पांच सुभाष हे निशि शशी तैसे अशोकारुण ॥
श्री गोविन्द पितामाहा दिनकरा तातास जो हर्षवी।
विद्वान सद्गुणवान् अनन्त वर हा कार्या करो मंगला ॥ २ ॥

विष्णूशंकर ब्रम्हरूप कमला -कान्तादि काका जया।
काकी पार्वति देवि आणि सुलभा या सत्यभामा जया ॥
या काशी मणिकर्णिका प्रगटल्या आत्या महन्मंगला।
हर्षाश्रू सह सर्ववर्षति शिरों मुक्ताक्षता मंगला ॥ ३ ॥

चि. सौ . सुशीला बाईस उद्देशून :-
जागा एक सुनी घरां तुमच्या होती सुशीला खरी।
आली सून सुधा , सुनें स्थल अतां प्रेमें सुनेनें भरी ॥
कन्या ही न असून , सून तुमची , कन्या च मानी हिला।
माया -छत्र धरी वधूवर , शिरीं छाया करी मंगला ॥ ४ ॥

चि.सौ. कां . सुधेस उद्देशून :-
सौभाग्यें नटलीस भाग्यवति हो , तूं माणक्यांच्या घरीं।
खेळी उज्वल मणिकांगणि  , असो सासू स्वमाते परी ॥
नामें तूहि सुधा सुधे सदृश हो , लाभे पती चांगला।
प्रेमें वाग मिळेल प्रेमसदनीं कार्या करी मंगला ॥ ५ ॥

चि. अनन्त यास उद्देशून :-
सारा सागर मंथुती मिळविली तुम्हीं अनन्ता ! सुधा।
वागा प्रेमभरें , मिळून करणे संसार नाहीं सुधा ॥

त्यागानेंच परस्परांत प्रगटे एकात्मता मंगला ।
श्री गोविन्द नृसिंह देव कृपया कार्या करा मंगला ॥ ६ ॥

तिथि - ज्येष्ठ वद्य त्रयोदशी संवत् २०२२
दिनांक वेळ २५ - ०६ - १९६५ वेळ ७ - १४ सकाळ ,
कार्यस्थळ : इंदूर

उभय वधूवरांचा शुभचिंतक
रामचंद्र वामन पंतोजी
इंदूर

मंगलाष्टक २८. ०१. १९६९

**चि सौ कां सुशीला भास्कर पन्तोजी आणि चि पुरुषोत्तम भास्कर कुलकर्णी**

॥श्री ॥

चि . सौ . कां. सुशीला भास्कर पंतोजी व चि . रा. पुरुषोत्तम भास्कर कुलकर्णी
यांच्या शुभ विवाह निमित्त लिहिलेली मंगलाष्टकें

दुर्गा भास्कर नन्दिनी शुभवधू प्रोत्फुल्ल ही अन्तरी ।
श्री मद्भास्कर नन्दना शुभवरा पुरुषोत्तमाला वरी ॥
वाटे ही पुरुषोत्तमास सुशिला लक्ष्मी महन्मंगला ।
सीताराम कृपें करो उभयतां कार्या नव्या मंगला ॥ १ ॥

आले बन्धु शरव्दसंत , विजया ही उज्वला भारती ।
बालासाब शकुन्तला सभागिनी तारा तशी मालती ॥
काकी माणिक अन्य आप्तहृदयीं आनन्द संचारला ।
हर्षे वर्षति ते वधूवर शिरीं मुक्ताक्षता मंगला ॥ २ ॥

दोनाचे कर चार आज दिसती झाले अहा एकदां ।
झाली चार करांत दोन हृदयें एकत्र हृत्संपदा ॥
दोन्हीं दृष्टित दृष्य एक प्रगटे सद्भाव दोघांतला ।
भिन्नत्वांतिल रम्य एकरसता कार्या करो मंगला ॥ ३ ॥

**चि. रा. पुरुषोत्तम राव यांस उद्देशून :-**

आनंदी , विदुषी , सुशील , सुशिला तुम्हां वधू अर्पिली ।
तुम्हां ही पुरुषोत्तमा स्मितमुखी पत्नी गुणी लाभली ॥
सांभाला नवजीवनोपवनिं ही श्री भास्कराची प्रभा ।
दोघे ही मिळुनी समुज्वल अशा कार्या करा मंगला ॥ ४ ॥

**चि. सौ. कां. सुशीलास उद्देशून :-**

सद्भाग्ये पुरुषोतमास वरूनी सौभाग्यसम्पन्न तू ।
योग्या योग्य मिले , सुयोग जुलवी संसारसाक्षी प्रभू ॥
प्रेमें वाग मिळेल प्रेम सुशिले ! ही जीवनाची कला ।
सर्वांना सुखवून तू अस सुखी कार्या करी मंगला ॥ ५ ॥

२८.०१. १९६९
भोपाळ

उभय वधूवरांचा
शुभचिंतक
रामचंद्र वामन पंतोजी

**चि. सौ. कां. डॉ. माणिक जयवंत वैद्य ,आठघरे आणि चि डॉ  जयंत रघुनाथ पागे**
**मंगलाष्टकें**

चि.सौ.कां. डॉ . माणिक जयवंत वैद्य , आठघरे
व
चि. डॉ . जयंत रघुनाथ पागे
यांच्या शुभ विवाहा निमित्त लिहिलेली
-: मंगलाष्टकें:-

जीचे श्री जयवंत तात , जननी स्वर्गीय देवी प्रभा ।
मृणाल मंगल या सुरेख भगिनी , बंधू जिचा हा प्रभा ॥
मामा , मावशी आप्त मंडळी मधे शोभे वधू माणिक ।
हर्षाश्रूसह सर्व वर्षति शिरीं मुक्ताक्षता मंगला ॥ १ ॥

ज्याचे श्री रघुनाथ तात जननी श्री इंदिरा पावनी ।
बन्धू श्री यशवंत , अनंत , वहिनी यशस्विनी मोहिनीं ॥
ज्याला सिन्धू शकुंतला सह प्रभा बांधीति मुंडावळ्या ।
पागे नामक श्री जयंत वर हा कार्या करो मंगला ॥ २ ॥

दोनाचे कर चार आज दिसती झाले अहा एकदां ।
झाली चार करांत दोन हृदयीं एकत्र हृत्संपदा ॥
दोन्ही दृष्टीत दृश्य एक प्रगटे सद्भाव दोघांतला ।
भिन्नत्वांतिल रम्य एक रसता कार्या करो मंगला ॥ ३ ॥

चि . कु . माणिक हीस उद्देशून :-
बाळे , आजवरी तुला जननिनें , तातें तसें पाळिलें ।
प्रेमे लाड तुझे सदा पुरविले , मागीतले तें दिलें ॥
आतां जें उरलें हवें तुज तसें तेंही तुला गे दिलें ।
दाम्पत्य - प्रणयांत मंगल नव्या कार्या करी मंगले ॥ १ ॥
सासू ची असुन दे तुझ्या वर मुली माया तशी सावली|
होवो मंगल ती सुमंगल मी आई परी माउली||
वाटो तू श्वशुरा जयंत पतिला लक्ष्मी महन्मंगला|
प्रेंमें वांग , मिळेल प्रेम जगतीं कार्या करी मंगला||२||

दोघांना उद्देशून:-
झाला आज जयंत - माणिक तुम्ही दोघे गृहस्थाश्रमी ।
संसारात समृद्धि , कीर्ति मिळवा दीर्घायु व्हा संयमी ॥
त्याग - प्रेम परस्परांत असुं द्या , ही जीवनाची कला ।
दोघे डॉक्टर - डॉक्टरीण मिळुनी कार्या करा मंगला ॥ ३ ॥

उभय वधूवरांचा हितचिंतक
रामचंद्र वामन पंतोजी

दिनांक :- २२ . ०५ . १९७२
तिथी :- वैशाख शुद्ध १० शके १८९४
कार्यस्थळ :- जाधव साहेबांचे दत्त मंदिर , ग्वाल्हेर

**चि धवल अतुल पंतोजी व्रतबंध निमित्त**

मंगलाष्टकें

मुरलीधर यशवन्त आजे द्विज आणि आजी पद्मजा
आई सन्ध्या , अतुल तात न आत्या स्मिता , काकी अर्पिता
दादा अनय , ताई श्रुति भेटे प्रेमी बटूला
पंतोजी दिक्षीत आप्त उधळीं मुक्ताक्षता मंगला

घालूनी मृगचर्म युक्त विमला यज्ञोपवीत सहा
हाती कमण्डल चिमुकला कौपीनधारी पहा
मुंजेची किती शोभते कटिवरी की कांचन मेखला
श्री मंगलमूर्ति धवल बटु कार्य करो मंगला

**चि . धवल यांस उद्देशून :-**
झाली धवल मुंज आज आपला अभ्यास आता करा
विद्वान सद्गुणि संयमी सुजन हो सौहार्द्रता अंतरीं
संसारात समृद्धि कीर्ति मिळवी तू शीक नाना कला
सर्वांना सुखवून तूं असो कार्या करी मंगला

कार्यस्थळ इन्दिरा मोरेश्वर सभागृह
शनिवारपेठ
पुणें
दिनांक ३ १ .०३ .२०१०